# संक्षिप्त संख्यानक



लेखक : श्री. चं. न. डफाळ
बी. ए.; बी. टी.; एम्. कॉम्.;
एफ्. एस्. ए. ए.; एफ् आय्. सी. ए.
एफ्. आर्. जी. एस्. ( लंडन )




विज्ञानमाला * पुष्प चौथे
१९६४

पहिली आवृत्ती १९६४



प्रकाशक :

महाराष्ट्र राज्य साहित्य
आणि
संस्कृति-मंडळ, सचिवालय
( विस्तारभवन ) मुंबई ३२



मुद्रक :

श्री. दा. त्र्यं. जोशी,
व्यवस्थापक चित्रशाळा प्रेस,
५६२ सदाशिव पेठ, पुणें २

वेष्टन छपाई :

सरकारी मुद्रणालय,
चर्नी रोड, मुंबई ४.



आकृत्या, रेखाचित्रे व ब्लॉक्स :
फोटो झिंको प्रेस, पुणे.

# निवेदन

मराठी भाषेला विद्यापीठाच्या भाषेचा दर्जा येण्याकरितां मराठींत विज्ञान, तत्त्वज्ञान, सामाजिक शास्त्रें आणि तंत्रविज्ञान या विषयांवरील ग्रंथांची रचना मोठ्या प्रमाणांत होण्याची आवश्यकता आहे. वरील विषयांवर केवळ परिभाषाकोश अथवा पाठ्य पुस्तकें प्रकाशित करून अशा प्रकारचा दर्जा मराठी भाषेला प्राप्त होणार नाहीं. सर्वसामान्य सुशिक्षितांपासून तों प्रज्ञावंत पंडितांपर्यंत मान्य होतील अशा ग्रंथांची रचना व्हावयास पाहिजे. मराठी भाषेंत किंवा अन्य भारतीय भाषांमध्यें विज्ञान, सामाजिक शास्त्रें व तंत्रविज्ञान या विषयांचें प्रतिपादन करावयास उपयुक्त अशा परिभाषा–सूची किंवा परिभाषा–कोष तयार होत आहेत. परिभाषा किंवा शब्द यांचा प्रतिपादनाच्या ओघांत समर्पकपणें वारंवार प्रतिष्ठित लेखांत व ग्रंथांत उपयोग केल्यानेंच अर्थ व्यक्त करण्याची त्यांत शक्ति येते. अशा तऱ्हेनें उपयोगांत न आलेले शब्द केवळ कोशांत पडून राहिल्यानें अर्थशून्य राहतात. म्हणून, मराठीला आधुनिक ज्ञानविज्ञानांची भाषा बनविण्याकरितां शासनविद्यापीठें, प्रकाशनसंस्था व त्या त्या विषयांचे कुशल लेखक यांनीं ग्रंथरचना करणें आवश्यक आहे.

वरील उद्देश ध्यानांत ठेवून महाराष्ट्र राज्य–साहित्य आणि संस्कृति-मंडळानें कार्यक्रम आंखला आहे. ह्या कार्यक्रमांतील पहिली पायरी म्हणून सामान्य सुशिक्षित वाचक–वर्गाकरितां सुबोध भाषेंत लिहिलेलीं पुस्तकें प्रकाशित करून स्वल्प किंमतींत देण्याची व्यवस्था केली आहे. या विज्ञान–मालेंतील "**संक्षिप्त संख्यानक**" हें चौथें पुस्तक श्री. चं. न. डफाळ, यांनीं लिहिलें आहे.

**लक्ष्मणशास्त्री जोशी**
अध्यक्ष,
महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृति–मंडळ.

---

# प्रास्ताविक

भारताचा विकास नियोजनांत आहे. नियोजन संख्या–शास्त्राधारें होतें. वर्तमानयुगांत संख्याशास्त्राची महती वर्णन करण्याचें प्रयोजन नाहीं. मानव-जीवनांतील एकहि प्रांगण संख्येपासून विमुक्त नाहीं. केवळ शास्त्रांतच नव्हे तर कलेंतहि संख्येची महती प्रस्थापित आहे. अशा ह्या अथांग संख्यासागराच्या पुलिनावर उभें राहून एक दृष्टिक्षेप टाकल्यास नजरेंत सामावणारें क्षितिज म्हणजेच "संक्षिप्त संख्यानक" होय.

पाश्चिमात्य देशांतून निरनिराळीं शास्त्रें व कला यांवर अशीं अनेक संक्षिप्त संस्करणें प्रचारांत आहेत. अशा संक्षिप्त पण संकलित संस्करणांमुळें पाठ्यपुस्तक म्हणून नेमलेल्या जाडजूड ग्रंथांतील अतिविस्तृत व सविस्तर अशा रुक्ष विषय-वस्तूंचेंहि अध्ययन करण्यास विद्यार्थ्यांस विशेषच मदत होते. विश्वकोशांतील लहान निबंध किंवा वर्गांतील विभ्रमणकारी पाठ ह्यांतील मधला मार्ग म्हणून अशा संक्षित पुस्तिका विद्यार्थ्यांची आवश्यक गरज भागवितात. शास्त्रीय तत्त्वांतील अनावश्यक भाग वेगळा करून शिकविलेल्या पाठांच्या रूपरेषा चांगल्याच स्पष्ट होऊन पुढील आयुष्यांत, अनुभवान्तीं, त्या रूपरेषांतील उणीव भरून काढण्याचें कार्य अशा संक्षिप्त पुस्तिकाच करूं शकतात.

संख्याशास्त्राच्या अथांग सागरांत अवगाहन करणाऱ्यास "संक्षिप्त संख्या-नका"ची भूमि अतिशय संकुचित भासेल. या शास्त्राच्या अधिक ज्ञानासाठीं जिज्ञासूंस माझ्या 'सांख्यिकीय–विधि' ह्या ग्रंथाकडेच वळावयास हवें. परंतु ह्याच कारणास्तव मला असें म्हणावेंसें वाटतें कीं, विद्यार्थी व सर्वसाधारण वाचक यांना संख्याशास्त्राच्या अभ्यासासाठीं, तसेंच ह्या क्षेत्रांत काम करणारे संशोधक यांस जवळ बाळगण्यासारखा संदर्भग्रंथ म्हणून संख्याशास्त्राचें हें असलें संक्षिप्त रूपच उपयोगी होय. ह्यांत दिलेलीं सूत्रें व उदाहरणें संख्येच्या कोणत्याहि क्षेत्रांतून काम करणाऱ्यांची अधिकांश गरज पूर्ण करतील.

गणितीय प्रतिपादन, तसेंच रुक्ष आणि अनावश्यक चर्चा वगळून, आव-श्यक आणि उपयुक्त तेवढींच खास सूत्रें आणि तत्संबंधींचीं उदाहरणें प्रस्तुत ग्रंथांत दिलीं आहेत. त्यामुळें त्यांची उपयुक्तता वाढण्यांत मदतच झाली आहे. संख्या-शास्त्राचे विद्यार्थी आणि या शास्त्राच्या अनेक उपांगांतून काम करणारे इतर यांचीं

आवश्यक तीं सूत्रें व इतर सामग्री अनेक ग्रंथांतून शोधण्याची यातायात नको, ह्या उद्देशानें सर्व गोष्टी संकलित करून या ग्रंथांत दिल्या असल्यानें कोणत्याहि संख्यानीय कर्मचाऱ्यास गणनयन्त्राप्रमाणेंच "संक्षिप्त संख्यानका"चीहि आवश्यकता आहे.

राष्ट्राच्या अभ्युदयाची किल्ली राष्ट्रीय शिक्षणांत असते. राष्ट्रीय शिक्षणाचें माध्यम म्हणून मातृभाषेचा वापर अनिवार्य होय. भारतांत ह्या शिक्षणांतील सर्वांत मोठी उणीव म्हणजे मातृभाषेंतून असणाऱ्या शास्त्रीय विषयांवरील पुस्तकांची, आणि संक्षिप्त संख्यानकें मराठींतून लिहिण्याचा अट्टाहासहि तर त्याचकरितां !

लोकमान्य नगर, पुणें २<br>ता. ३० सप्टेंबर १९६४.

चं. न. डफाळ

---

# अनुक्रमणिका

---

## प्रकरण १

# संख्यानीय श्रेणी

संख्याशास्त्रांतर्गत केलेली परिपृच्छा ( चौकशी ) प्रयोग अथवा अधिक्षण ह्यामुळे प्राप्त होणारा न्यास, हा नेहमी इयत्तात्मक असतो. तसाच तो विशालरूपही असतो. अशा ह्या इयत्तात्मक न्यासाचे विश्लेषण, वर्गीकरण व मांडणी यासाटी ज्या एका विशिष्ट प्रक्रियेचा उपयोग केला जातो, त्यास संख्यानीय विधी असे म्हणतात.

ह्या संख्यानीय विधीची मूलतत्त्वे खालीलप्रमाणे—

( १ ) न्यास गोळा करणे व तो एकत्रित मांडणे.

( २ ) न्यासाचे वर्गीकरण व त्यास संक्षिप्त रूप देणे.

( ३ ) त्या न्यासाचे खालील तीन रूपात दिग्दर्शन करणे.

( अ ) वृत्तान्त ( Textular ) रूपात.

( ब ) सारणीच्या रूपात.

( क ) चित्राकृतीच्या रूपात.

( ४ ) न्यासाचे विश्लेषण करणे.

ह्या संख्यानीय विधीच्या मर्यादा व लक्षणे पुढीलप्रमाणे समजावीत

( १ ) विपुल असा हा इयत्तात्मक न्यास फक्त संख्यानीय विधीद्वाराच हाताळला जाऊ शकतो.

( २ ) इयत्तात्मक रूपात रूपांतरित होऊ शकणाऱ्या समंकावरच फक्त ह्या संख्यानीय विधिद्वारा प्रक्रिया होऊ शकतात.

( ३ ) संख्यानीय प्रक्रिया निरपेक्ष ( Objective ) असतात. त्यांपासून प्राप्त होणारे परिणाम मात्र त्यातील निर्वचनाप्रमाणे प्रातीतिक ( Subjective ) समजावे.

( ४ ) संख्यानीय विधी तथा प्रक्रिया; आर्थिक, शैक्षणिक, समाजशास्त्र तथा मानसशास्त्र, वगैरे सर्व क्षेत्रांतून सारख्याच लागू आहेत.

## संख्यानीय श्रेणी

इयत्तात्मक न्यासाचे विश्लेषण करण्यापूर्वी त्या सर्व न्यासाची प्रथम नीट पद्धतशीरपणे मांडणी करावयास हवी. ही रचना निरनिराळ्या तऱ्हेने करिता येते. अशा तऱ्हेने केलेल्या ह्या रचनेस 'बंटन' अथवा 'श्रेणी' असे म्हणतात. न्यासाचे रचनेप्रमाणे प्राप्त होणारी बंटने अथवा श्रेणी खालीलप्रमाणे होत:—

( य ) समंकाच्या महत्तेप्रमाणे न्यासाची रचना केल्यास जी श्रेणी प्राप्त होते त्या श्रेणीस 'वारंवारता बंटन श्रेणी' असे म्हणतात.

( र ) समंकांची रचना कालक्रमानुसार केल्यास प्राप्त होणाऱ्या श्रेणीस कालिक-श्रेणी असे म्हणतात.

( ल ) भौगोलिक स्थापनपरत्वे समंकांची रचना केल्यास प्राप्त होणाऱ्या श्रेणीस स्थलीय ( Spatial ) बंटन असे म्हणतात.

ह्याशिवाय समंकाची मात्रा अथवा त्याचे प्रकार ह्या अनुरोधाने समंकांची मांडणी केल्यास विशिष्ट अशी खास निरनिराळ्या प्रकारची बंटने प्राप्त होतात.

## वारंवारता बंटन

प्राप्त इयत्तात्मक न्यासाची त्यातील समंकाच्या महत्तेप्रमाणे अथवा आकार-मानाप्रमाणे रचना केल्यास येणाऱ्या श्रेणीस 'वारंवारता बंटन श्रेणी' असे म्हणतात. ही श्रेणी खाली दिलेल्या नियमांनुसार तयार करितां येते:—

( १ ) इयत्तात्मक न्यासातील विस्तार किती हे प्रथम शोधून काढावे. न्यासातील उच्च व कनिष्ठ अंकातील फरकास अथवा तफावतीस विस्तार असे म्हणतात.

( २ ) ह्या विस्तारात किती संभाग बसतील हे ठरवावे व मग त्या अनुषंगाने संभागान्तराल निश्चित करावा.

हा संभागान्तराल खालील सूत्रद्वारा साधारणतया निश्चित होऊ शकतो.

$$\text{श} = \frac{\text{विस्तार}}{१ + ३\cdot३२२ \text{ छे. डा.}}$$

ज्यात; श = संभागान्तराल.

डा = एकूण पदसंख्या.

(३) हे संभाग मग चढत्या क्रमाने एकानंतर एक असे सारणीतील पहिल्या स्तंभात लिहावे.

(४) प्राप्त इयत्तात्मक न्यासातील समंक ह्यापैकी कोणत्या संभागात पडतील हे ठरवावे. त्याकरिता न्यासातील प्रत्येक समंकाकरिता संभागासमोर एक रेघ ओढावी. (पहा सारणी १)

भृती परिपृच्छेद्वारा प्राप्त खालील अपक्व न्यास पहा :

| साप्ताहिक भृती | कामगार संख्या | साप्ताहिक भृती | कामगार संख्या |
|---|---|---|---|
| १<br>शिलिंग–पेन्स | २ | १<br>शिलिंग–पेन्स | २ |
| १४– | १ | २८ | १ |
| १५– | १ | २९ | १ |
| १८– | ४ | ३० | १० |
| १९– | २ | ३१ | १ |
| २०– | ७ | ३२ | १ |
| २०·६ | १ | ३२·६ | १ |
| २१– | ४ | ३५ | १ |
| २२– | ४ | ३६ | १ |
| २३– | २ | ३८ | १ |
| २४– | ८ | ४० | ३ |
| २५– | ७ | ४५ | ६ |
| २५·६ | १ | ५० | १ |
| २७– | १ | ५५ | १ |
| | | एकूण | ७२ |

सदर परिपृच्छेतील इयत्तात्मक तत्त्वे दोन :

(१) मापांकित लक्षण : साप्ताहिक भृती.

(२) वारंवारता : कामगारसंख्या.

वरील इयत्तात्मक न्यासाचे नीट आकलन होण्याकरिता संक्षिप्त रूपात ह्यांची रचना करावयास हवी.

सदर न्यासाचा विस्तार ५५−१४=४१ शिलिंग एवढा आहे. ५−शिलिंगाचा संभागान्तराल ठेवल्यास एकूण ८ अथवा ९ संभाग पडतील. हा संभागान्तराल धरून संभाग पाडल्यास दिलेल्या इयत्तात्मक न्यासाची ताळेबंदासहित वारंवारता बंटन श्रेणी खालीलप्रमाणे तयार होतेः—

## सारणी−१

कामगारांस मिळणाऱ्या भृतीप्रमाणे प्राप्त वारंवारता बंटन.

| साप्ताहिक भृती (१) संभागान्तराल | ताळा | कामगार−संख्या (२) वारंवारता |
|---|---|---|
| शिलिंग−पेन्स | | |
| १२·५—१७·५ | // | २ |
| १७·५—२२·५ | 卌 卌 卌 卌 // | २२ |
| २२·५—२७·५ | 卌 卌 卌 //// | १९ |
| २७·५—३२·५ | 卌 卌 //// | १४ |
| ३२·५—३७·५ | /// | ३ |
| ३७·५—४२·५ | //// | ४ |
| ४२·५—४७·५ | 卌 / | ६ |
| ४७·५—५२·५ | / | १ |
| ५२·५—५७·५ | / | १ |
| | | एकूण ७२ |

म = २७·८५ शि. मा. = २५·६६ शि. भू = २१·८५ शि.

$तु_1$ = २१·१४ शि. $तु_3$ = ३१·४३ शि. $घा_2$ = २५·० शि.

रि = ७·०१२५ शि. घि = ८·८५ शि. तु. वि. = ५·१४५ शि.

फा. = ३१·७५ शि.

## वारंवारता बंटनाचे चित्रांकण

ठराविक प्रमाणात विभाजित केलेल्या दोन रेषा 'म' ह्या बिन्दूवर काटकोनात उभ्या केल्या तर दिलेला न्यास त्यांच्या अनुषंगाने आपणास चित्रित करता येतो. अनुप्रस्थ रेषेस 'य–अक्ष' असे म्हणतात. उदग्र रेषेस 'र–अक्ष' असे म्हणतात.

कोणत्याहि बिन्दूच्या अर्हा दिल्यास तो बिन्दू अशा तऱ्हेने तयार केलेल्या ग्राफमध्यें दाखविता येतो. ( आकृति १ ) य = २ व र = ३ असे अक्ष असणाऱ्या एका बिन्दूचे चित्रांकण आकृति १ मध्ये 'ब' ने दाखविले आहे.




आकृति १ :— य = २, र = ३ बिन्दूचे चित्रांकण

दिलेल्या न्यासाच्या एककात हे दोन्ही अक्ष दिल्यास वरील वारंवारता बंटन चित्ररूपानेही दर्शविता येईल. त्याकरिता—

( १ ) स्वतंत्र चल हा अनुप्रस्थ य – अक्षावर दाखवावा. परतन्त्र चल हा उदग्र र – अक्षावर दाखवावा. वारंवारता श्रेणीतील संभागान्तरालास स्वतंत्र-चल समजावे व वारंवारतेस परतंत्र–चल समजावे.

( २ ) वारंवारता ही त्या संभागान्तरालातील मध्य बिन्दूने र–अक्षावर सुयोग्य अशा अन्तराने दर्शित होते.

( ३ ) अशा तऱ्हेने प्रांकणानंतर प्राप्त झालेले बिन्दू सांधल्यास **वारंवारता बहुभुज चित्र** तयार होते. ( आ.२ )




**आकृती २ :**–एका फॅक्टरीतील कामगारांच्या साप्ताहिक भृतीचे वारंवारता बहुभुज चित्र.

( ४ ) संभागान्तराल ही रुंदी व त्या संभागान्तरालातील वारंवारता ही उंची धरल्यास मिळणाऱ्या आयताच्या आकृतीमुळे 'आयताकार वारंवारता बहुभुज चित्र' तयार होते. ह्यासच **आयतचित्र** असे म्हणतात. ( आ. ३ )




**आकृती ३:**—एका फॅक्टरीतील कामगारांच्या साप्ताहिक भृतीचे आयत चित्र.

## संचयी वारंवारता बंटन :

वारंवारतेच्या संचयनामुळे प्राप्त होणाऱ्या बंटनास संचयी बंटन असे म्हणतात. आयुर्विमा वगैरे सारख्या ठिकाणी अशा प्रकारच्या संचयी बंटनाची आवश्यकता अतिशय असते. सारणी १ मधील न्यास संचयी रीतीने खालीलप्रमाणे लिहिता येईल.

## सारणी २

कामगारांच्या साप्ताहिक-भृतीचें संचयी बंटन.

| साप्ताहिक भृती (१) संभागान्तराल (शिलिंग) | कामगार-संख्या (२) वारंवारता | संचयी—वारंवारता (३) | |
|---|---|---|---|
| | | आरोही | अवरोही |
| १२·५—१७·५ | २ | २ | ७२ |
| १७·५—२२·५ | २२ | २४ | ७० |
| २२·५—२७·५ | १९ | ४३ | ४८ |
| २७·५—३२·५ | १४ | ५७ | २९ |
| ३२·५—३७·५ | ३ | ६० | १५ |
| ३७·५—४२·५ | ४ | ६४ | १२ |
| ४२·५—४७·५ | ६ | ७० | ८ |
| ४७·५—५२·५ | १ | ७१ | २ |
| ५२·५—५७·५ | १ | ७२ | १ |
| | ७२ | | |

सारणी २ वरून दिसून येईल की ही संचयी वारंवारता दोन तऱ्हेनें तयार होते. (१) आरोही संचयः ज्यामुळें एका विशिष्ट भृतीखाली किती कामगार होते हे ह्यावरून कळते. उदाहरणार्थ आठवड्याला २२·५ शिलिंगांपेक्षा कमी मजुरी मिळविणारे एकंदर २४ कामगार होते. वगैरे (२) **अवरोही संचयः** ज्यामुळें एका विशिष्ट मजुरीपेक्षा जास्त मजुरी मिळविणारे किती कामगार होते हे अवरोही-संचयनामुळे कळते. उदाहरणार्थ—आठवड्याला २२·५ शिलिंगांपेक्षा अधिक मजुरी मिळविणारे एकूण ४८ कामगार होते. वगैरे—

अशा प्रकारचे संचयी वारंवारता बंटन हे साध्या वारंवारता बंटनापेक्षा अधिक नियमित असते. साध्या वारंवारता बंटनांतील संभागान्तराल सारख्या अन्तराचे असतात. संचयी वारंवारता बंटनातील संभागान्तराल असम अन्तराचे असले तरी त्यामुळे काहीं अडचण उद्भवत नाही.

संचयी वारंवारता बंटनाचे चित्रांकण आकृती ४ व ५ मध्ये दिले आहे.




आकृति ४ व ५ : आरोही-अवरोही संचय

## विश्लेषण

अधिक्षणान्ती प्राप्त होणारा न्यास अवाढव्य प्रमाणात असल्याने तो हाताळावयाचा असल्यास त्याचे वर्गीकरण करून त्यास संक्षिप्त रूप द्यावयास हवे. त्यानंतरच अशा न्यासाचे विश्लेषण शक्य आहे. याकरिता वारंवारता बंटनातील न्यासाची अगोदर नीट जुळणी व मांडणी व्हावयास हवी. त्यानंतर त्यावर अनेक प्रक्रिया करून त्याचे विश्लेषण करावे. निव्वळ वर्गीकरण केल्यानेच विश्लेषणाचे काम भागणार नाही.

## वारंवारता बंटनाचे प्रकार

साधारणतः नेहमी अवलोकनांत असणारे बंटनाचे प्रकार खाली दिले आहेत परन्तु ह्याशिवाय ( अ ) बहुगुणी-भूयिष्ठ-वारंवारता वक्र, ( ब ) अंकुशाकार वक्र, ( क ) ऊर्ध्व बाहू वक्र वगैरे सारखेही काही विशिष्ट प्रकार आढळात येतात.

( १ ) **संमित बंटन :** प्रसामान्य वक्र ( अथवा घंटाकार वक्र ) हे संमित बंटनाचे सर्वात उत्तम उदाहरण होय. ( आ. ६ )




आ. ६ — एका फॅक्टरीतील कामगारांच्या भृतीवरून तयार केलेले प्रसामान्य वक्र

( २ ) **असंमित बंटने :** बहुतेक वारंवारता बंटने ही कोणत्या तरी एका बाजूस कललेली आढळून येतात. अशा बंटनास असंमित बंटने असे म्हणतात. कारण त्यांच्या दोन्ही बाजू सारख्या, म्हणजे संमित नसतात.

( अ ) **दक्षिणायत विषमता बंटन :** अशा बंटनातील अत्युच्च अर्हा बंटनाच्या चरमसीमेत असलेल्या आढळून येतात. त्यामुळे अशा प्रकारची सर्व बंटने बहुधा उजवीकडेच विरूपित झालेली आढळून येतात. ( आ. ७ )




आ.७–दुसऱ्या एका फॅक्टरीत मिळणाऱ्या भृतीप्रमाणे चित्रांकित दक्षिणायत विषमता बंटन

**( ब ) वामायत विषमता बंटन :** अशा बंटनातील चरम सीमेतील अंश लहान असतात. त्यामुळे सदर बंटन डावीकडे विरूपित होते. असले बंटनाचे प्रकार क्वचित दृष्टीस पडतात. ( आ. ८ )




आ. ८—एका फॅक्टरीतील भृतीवरून चित्रांकित वामायत विषमता बंटन.

आर्थिक, सामाजिक व प्राकृत क्षेत्रातील न्यासांतून बहुधा एका बिन्दूभोवती गोळा होण्याची वृत्ती आढळून येते. ह्या वृत्तीमुळेच अशा वारंवारता बंटनाचे चित्रांकण केल्यास येणाऱ्या आकृतीत एक शिखर आढळून येते. आकृतीतील अशा तऱ्हेचे शिखर म्हणजे बंटनातील केंद्रीय-वृत्तीचे निदर्शक होय त्या केंद्रीय वृत्तीचें मापनही होऊं शकते. खालील (आ. ९) आकृतीतील दोन्ही बंटने सारखीच आहेत. त्यांतील केंद्रीय-वृत्तिनिदर्शक बिन्दू तेवढे वेगळे आहेत.

संकलित न्यासातील अर्हांची एका विशिष्ट बिन्दूभोवती गोळा होणाऱ्या ह्या वृत्तीमुळेच, त्या सबंध न्यासाचे वर्णन केवळ एका विशिष्ट व्यक्तिगत अर्हेमुळे साध्य होते. ह्या केंद्रीयवृत्ति-निदर्शक बिन्दूचे मापन व स्थान निश्चिती माध्याने होऊ शकते.




आ. ९ :–दोन फॅक्टरींतील कामगारांच्या भृतीवरून चित्रांकित वारंवारता बंटन वक्र.

**अपकिरण :** आकृती १० मध्यें दर्शविलेल्या दोन्ही बंटनांची लक्षणे सारखीच्च आहेत. अ-वक्रांत अंतर्भूत असलेल्या पद–अर्हा मात्र ब–वक्रातील पद–अर्हांपेक्षा भिन्न आहेत. त्यातील विचरणेही भिन्न आहेत. वक्रातील विचरणांच्या ह्या मात्रेस अपकिरण असे म्हणतात. श्रेणीतील निरनिराळ्या पदांच्या विचरण मात्रेचाही त्यामुळे बोध होतो.




आ. १०:–दोन फॅक्टरीतील कामगारांच्या भृतीवरून चित्रांकित वारंवारता वक्र.

**विषमता :** आकृती ११ मध्ये दोन वक्र दाखविले आहेत. त्यापैकी 'अ' हे वक्र संमितीय आहे; तर 'ब' हे वक्र असंमितीय आहे. अशा प्रकारच्या असंमितीयतेस विषमता असे म्हणतात.




आ. ११ :–दोन फॅक्टरीतील कामगारांच्या भृतीचे वारंवारता बंटन वक्र.

परन्तु आकृती १२ मधील वक्रांकडे दृष्टिक्षेप केल्यास असे दिसून येईल की एक वक्र दुसऱ्यापेक्षा अधिक उंच आहे. अशा प्रकारच्या शिखर–उंचीस **ककुद् वक्रता** असे म्हणतात.




आ. १२:–दोन फॅक्टरींतील कामगारांच्या भृतीवर आधारित वारंवारता बंटन वक्र.

प्रकरण २

# वारंवारता बंटन विश्लेषण

## केन्द्रीय-वृत्ती व समान्तर मध्यक

### सर्वसाधारण वृत्तीचे मापांक : माध्य

एकत्रित केलेल्या विपुल अशा न्यासाचे वर्णन अथवा त्याचे संक्षिप्त निरूपण माध्य ह्या एकाच विशिष्ट अर्हेने होऊ शकते. न्यासातील चरम व आत्यंतिक अर्हांचे मापनही माध्याद्वारे शक्य आहे. केंद्रीय-वृत्ति-निदर्शनार्थही माध्याचा उपयोग होतो.

**माध्याचे प्रकार :**

माध्याचे मुख्य प्रकार असे :

( १ ) समान्तर मध्यक ( म. )

( २ ) मध्यका ( मा )

( ३ ) भूयिष्टक ( भू. )

( ४ ) गुणोत्तर मध्यक ( ग )

( ५ ) हरात्मक मध्यक ( ह )

**समान्तर मध्यक :**

गणनेस सोपे व नेहमीच्या प्रचारातील असे हे माध्य असून अनेक माध्यापैकी तेच एक विशेष उपयोगी असे माध्य आहे.

**समान्तर मध्यक गणना : ( अवर्गीकृत न्यास )**

कोणत्याही इयत्तात्मक न्यासाचा समान्तर मध्यक हा त्या न्यासातील वैयक्तिक पदांच्या एकूण बेरजेस त्या न्यासातील एकूण पदसंख्येने भागल्यास येतो.

समान्तर मध्यक गणनेचे सूत्र असे :

$$म = यो_{ट} / डा \ldots \qquad (१)$$

ज्यात म = समान्तर मध्यक; यो = योग.

ट = न्यासातील वैयक्तिक पदे; डा = एकूण पदसंख्या.

उदाहरणार्थ, २, ५, ६ व ७ चा समान्तर मध्यक—

$यो_{ट} = ( २ + ५ + ६ + ७ ) = २०.$ डा = ४

$\therefore यो_{ट} / डा = \frac{२०}{४} = ५$ ( म. )

अमर्यादित पदसंख्या असल्यास त्याने समान्तर मध्यक वरील सूत्र उपयोगात आणून काढणे सहजासहजी शक्य नाही. ते अतिशय जिकिगीचे व त्रासदायक होते. त्यात विभ्रमाचा अंशही अधिक असतो. कधीकधी तर न्यासातील ह्या अमर्याद पदांची बेरीज करणे अशक्यप्राय होते. चाळीस ते पन्नास हजार पदांचा अचूक असा समान्तर मध्यक काढणे, मशीनच्या साहाय्यानेसुद्धा जवळजवळ अशक्यप्रायच होय.

त्याकरिता सरळ पण कार्यक्षम विधी म्हणजे प्राप्त न्यास वर्गणविधीने वारंवारता बंटनात मांडावा व त्यानंतर खाली दिलेल्या कोणत्याही एका पद्धतीने त्याचा समान्तर मध्यक काढावा. उदाहरणार्थ सारणी ३ मधील न्यासाचा समान्तर मध्यक काढताना असे गृहीत धरण्यात येते की कोणत्याही एका संभागान्तरालातील सर्व अर्हा ह्या त्या संभागान्तरालात समप्रमाणात बंटीत असून त्या सर्व अर्हांचा मध्यक त्या संभागान्तरालाच्या मध्य बिन्दूशीं जुळतो.

ह्यावरून जे उपप्रमेय सिद्ध होते ते असे : कोणत्याही संभागान्तरालातील एकूण पदसंख्येचा त्या संभागान्तरालातील मध्य बिन्दूशी गुणाकार केला तर येणारी संख्या ही त्या सर्व पदांच्या एकूण बेरजेइतकी असते.

## सारणी–३

समान्तर मध्यक गणना.

एका फॅक्टरीतील कामगारास मिळणाऱ्या साप्ताहिक भृतीवर आधारित न्यास

| साप्ताहिक भृती (१) | मध्य-बिन्दू ट (२) | वारंवारता च (३) | स्तंभ (२) × स्तंभ (३) च × ट (४) |
|---|---|---|---|
| १२.५—१७.५ | १५ | २ | ३० |
| १७.५—२२.५ | २० | २२ | ४४० |
| २२.५—२७.५ | २५ | १९ | ४७५ |
| २७.५—३२.५ | ३० | १४ | ४२० |
| ३२.५—३७.५ | ३५ | ३ | १०५ |
| ३७.५—४२.५ | ४० | ४ | १६० |
| ४२.५—४७.५ | ४५ | ६ | २७० |
| ४७.५—५२.५ | ५० | १ | ५० |
| ५२.५—५७.५ | ५५ | १ | ५५ |
| | | ७२ | २,००५ |

$\therefore$ मू = $\frac{२,००५}{७२}$ = २७·८५ शिलिंग

ह्या ठिकाणी उपयोगात आणलेले सूत्र असे :—

$$म = यो (च \times ठ) / डा \qquad (२)$$

वरील गणनेप्रीत्यर्थ उपयोगात आणलेल्या विधीस '**दीर्घ-रीती**' असे म्हणतात. वारंवारता व मध्य बिन्दू अहो ह्या बाजवी मोठ्या असल्या तर वरील-प्रकारे गणना करणे अतिशय क्लिष्ट व त्रासदायक होते; म्हणून खालील सिद्धान्तावर आधारित '**लघु-रीती**' चा उपयोग करावा.

तो सिद्धान्त असा : "कोणत्याही श्रेणीतील पद-अहोंच्या माध्यापासूनचा विचलनाचा एकूण बीजीय योग शून्य असतो." उदाहरणार्थ :

१० विद्यार्थ्यांना गणितात मिळालेले प्रतिशत गुण —

| विद्यार्थी क्रमांक | प्रतिशत गुण | माध्यापासूनचे विचलन |
|---|---|---|
| १ | ९५ | १५ टक्के |
| २ | ९२ | १२ |
| ३ | ९० | १० |
| ४ | ८६ | ६ |
| ५ | ८६ | ६ |
| ६ | ८० | ० |
| ७ | ७५ | −५ |
| ८ | ७२ | −८ |
| ९ | ६४ | −१६ |
| १० | ६० | −२० |
| | एकूण ८०० प्रतिशत | ० |

$\therefore$ म = $\frac{८००}{१०}$ = ८० टक्के.

खऱ्या समान्तर मध्यकेऐवजी दुसराच एखादा माध्य निवडला तर मग आलेल्या विचलनांची बेरीज शून्य होणार नाही. वरील उदाहरणात ८० ऐवजी ९० प्रतिशत हा सुद्धा स्वेच्छमूलबिन्दू मानता येईल. त्यास मग कल्पित माध्य असे म्हणावे. ह्या कल्पित माध्यास 'म′' ही संज्ञा लावावी.

१० विद्यार्थ्यांना गणितात मिळालेले प्रतिशत गुण

| विद्यार्थी क्रमांक | प्रतिशत-गुण | कल्पित-माध्यापासूनची विचलने घ |
|---|---|---|
| १ | ९५ | + ५ टक्के |
| २ | ९२ | + २ |
| ३ | ९० | ० |
| ४ | ८६ | − ४ |
| ५ | ८६ | − ४ |
| ६ | ८० | −१० |
| ७ | ७५ | −१५ |
| ८ | ७२ | −१८ |
| ९ | ६४ | −२६ |
| १० | ६० | −३० |
| | ८००टक्के | −१०० टक्के |

∴ कल्पित माध्यापासूनचे मध्यक विचलन = $\frac{१००}{१०}$

= −१० टक्के

आलेली ही अर्हा मूळ कल्पित माध्यात मिळविल्यास येणारा समान्तर मध्यक ९० + ( −१० ) = ८० हा सत्य माध्य होय.

वरील उदाहरणात आलेले कल्पित माध्यापासूनचे मध्यक विचलनास 'ग' म्हटल्यास सत्य-माध्य ( म ) हे कल्पित माध्य ( म′ ) अधिक मध्यक विचलनाच्या ( ग ) बरोबर होय.

सूत्र-रूपाने हे समीकरण असे लिहिता येईल.:

$$म = म' + ग$$

सारणी ३ मधील न्यासाकरिता लघु-रीतीने समान्तर मध्यक गणना खालील-प्रमाणे करावी.

## सारणी–४

समान्तर मध्यक गणना ( लघु-रीती )

एका फॅक्टरीतील कामगारास मिळणाऱ्या साप्ताहिक भृतीच्या आधारे

| मध्य–भृती<br>ठ<br>( १ ) | कल्पित माध्यापासूनचे अन्तर<br>घ<br>( २ ) | वारंवारता<br>च<br>( ३ ) | स्तंभ × स्तंभ<br>२ ३<br>चघ<br>( ४ ) |
|---|---|---|---|
| १५ | – २ | २ | –४ |
| २० | – १ | २२ | –२२ |
| २५ | ० | १९ | ० |
| ३० | + १ | १४ | +१४ |
| ३५ | + २ | ३ | + ६ |
| ४० | + ३ | ४ | +१२ |
| ४५ | + ४ | ६ | +२४ |
| ५० | + ५ | १ | +५ |
| ५५ | + ६ | १ | +६ |
| | | एकूण ७२ | + ४१ |

$\therefore$ म′ = २५ ग = $\frac{४१}{७२}$ आणि संभागान्तराल = ५ शि.

$\therefore$ म = म′ + ग = २५ + $\frac{४१}{७२}$ × ५

= २५ + २·८५ = २७·८५ शि.

सूत्ररूपाने हे खालीलप्रमाणे दर्शविता येईल :

$$\text{म} = \text{म}' + \frac{\text{यो (च. घ)}}{\text{ह्य}} \times \text{श.} \qquad (३)$$

वरील कृतीचा थोडक्यात सारांश खालीलप्रमाणे :

( १ ) न्यासाची वारंवारता बंटनात रचना करावी.

( २ ) शक्य असल्यास गणनेकरिता कल्पित माध्य (म′) बंटनाच्या मध्यभागी धरावा.

( ३ ) सारणीत ‘घ’ असा एक आणखी स्तंभ निश्चित करावा. कल्पित माध्य असणाऱ्या संभागास शून्य समजून, त्याच्या खालच्या संभागाला –१ व त्याच्या वरच्या संभागाला + १ ह्याप्रमाणे प्रत्येक संभागाचे मापन द्यावे.

( ४ ) संभागाची वारंवारता ( च ) व त्याचे कल्पित माध्यापासूनचे विचलन ( घ ) ह्यांचा गुणाकार करून तो ( चघ ) ह्या स्तंभात लिहावा.

( ५ ) 'चघ' —ह्या स्तंभातील सर्व संख्यांचा बीजीय योग घ्या.

( ६ ) आलेल्या योगास एकूण वारंवारतेने ( डा ) भागावे. आलेला भागाकार हा संभागान्तराल एककातील शोधित 'ग' होय.

( ७ ) शोधित 'ग' व संभागान्तराल राशीचा गुणाकार केल्यास मूल 'ग' प्राप्त होतो.

( ८ ) मूल 'ग' व म' ची बेरीज केल्यास न्यासाचे समान्तर मध्यक येईल.

**समान्तर मध्यकाची लक्षणे :**

( १ ) समान्तर मध्यक अर्हा ही बंटनातील प्रत्येक पदावरून निश्चित करण्यात येते. हे माध्य संगणितीय असते.

( २ ) बंटनातील चरम—अर्हेमुळे ते लगेच बदलते.

( ३ ) समान्तर मध्यकेपासूनच्या विचलनांचा योग नेहमी शून्य असतो.

( ४ ) बंटनातील पदांच्या समान्तर मध्यकेपासूनच्या विचलनांच्या वर्गांचा योग हा ह्या बंटनातील इतर कोणत्याही बिन्दूपासून काढलेल्या विचलनांच्या वर्गांच्या योगापेक्षा लहान असतो.

( ५ ) समान्तर मध्यकेचा प्रमाप विभ्रम हा मध्यकाच्या प्रमापविभ्रमापेक्षा कमी असतो.

( ६ ) कोणत्याही परिस्थितीत समान्तर मध्यकेची अर्हा निश्चित अशी असते.

**समान्तर मध्यकेचे फायदे :**

( १ ) समान्तर मध्यक हे नेहमीच्या प्रचारातीलच एक माध्य होय.

( २ ) समान्तर मध्यक हे समजण्यास अतिशय सोपे असे माध्य आहे.

( ३ ) हे माध्य सर्वत्र मान्यता पावलेले आहे.

( ४ ) समान्तर मध्यकेचा गणन—विधी सापेक्षतः सोपा आहे.

( ५ ) ह्या माध्याच्या गणनेत फक्त एकूण अर्हा व पद संख्येचीच आवश्यकता असते.

( ६ ) समान्तर मध्यक हे बीजीय पद्धतीने हाताळता येते.

फक्त एकच मोठा दोष समान्तर मध्यकेत आढळतो. बंटनातील पदांच्या अर्हा जर अतिशय चरम सीमेच्या असतील तर मध्यक अर्हा ही विरूपित होते. अशा परिस्थितीत समान्तर मध्यक हे न्यासाचे आदर्श माध्य म्हणून मानता येणार नाही.

---

# प्रकरण ३

# वारंवारता बंटन–माध्य

**मध्यका :**

दिलेल्या न्यासातील पदांची त्यांच्या आकारमानानुसार रचना केल्यास त्यांतील मध्य पदाची जी अर्हा येईल त्यास मध्यका असे म्हणतात. न्यासात सम–पदे असल्यास दोन केन्द्रीय पदांचा समान्तर मध्यक न्यासाचा मध्य बिन्दू मानावा.

मध्यका हे स्थितीपरत्वे प्राप्त होणारे माध्य होय. समान्तर–मध्यक हे संगणित माध्य आहे.

## गणना ( अवर्गीत न्यास )

अवर्गीत न्यासाची मध्यका खाली दिलेल्या नियमानुसार निश्चित करावी.

( १ ) न्यासातील पदे ही त्यांच्या महत्तेप्रमाणे मांडावी. ( ह्यासच **अनुविन्यसन** असे म्हणतात. )

( २ ) येणाऱ्या श्रेणीच्या मधल्या पद–अर्हेची नोंद करावी. ही मध्यका होय. न्यासात सम–पदे असतील तर श्रेणीचा मध्य–बिन्दू म्हणून दोन अर्हा येतील अशा वेळेस त्या दोन्ही अर्हांचा समान्तर मध्यक मध्यका म्हणून ओळखावा.

## वर्गीत न्यास

वर्गीत न्यासाची मध्यका आन्तर गणनेद्वारा संगणित केली जाते. न्यासातील एकूण पदास ( डा ) दोहोंनी भागावे; व डा / २ ह्या पदाची जी अर्हा येईल, ती त्या वर्गीत न्यासाची मध्यका होय. ही अर्हा आन्तर गणनेद्वारा कशी काढावी ते खालील उदाहरणावरून स्पष्ट होईल.

### सारणी ५

मध्यकाचे गणन

एका फॅक्टरीतील कामगारांस मिळणाऱ्या साप्ताहिक भृतीच्या आधारे

| साप्ताहिक–भृती ( शिलिंग ) | कामगार–संख्या ( वारंवारता ) | संचयी–वारंवारता |
|---|---|---|
| १२·५–१७·५ | २ | २ |
| १७·५–२२·५ | २२ | २४ |
| २२·५–२७·५ | १९ | ४३ |
| २७·५–३२·५ | १४ | ५७ |
| ३२·५–३७·५ | ३ | ६० |
| ३७.५–४२·५ | ४ | ६४ |
| ४२·५–४७·५ | ६ | ७० |
| ४७·५–५२·५ | १ | ७१ |
| ५२·५–५७·५ | १ | ७२ |
| | ७२ | |

( १ ) एकूण पदे = ७२ ∴ डा / २ = $\frac{७२}{२}$ = ३६.

३६ हे पद तिसऱ्या संभागात येते. त्यात एकूण १९ पदे आहेत. पहिल्या दोन संभागात एकूण पदे २४. तेव्हा तिसऱ्या संभागातील १२ पदे त्यात मिळविल्यास आपणास मध्यका अर्हा मिळेल. तिसऱ्या संभागाचे संभागान्तर ५ शिलिंग आहे. एकूण १९ पदअर्हांची किंमत ५ शिलिंग तर फक्त १२ पदअर्हांची किंमत $\frac{१२×५}{१९}$ = ३.१५७९.

तिसऱ्या संभागान्तरालाची सुरुवात २२.५शिलिंगांनी होते. म्हणून ३६ व्या पदाची अर्हा २२.५ + ३.१६ = २५.६६ शिलिंग ही होय.

( २ ) ज्याप्रमाणे मध्यकाचे संगणन वारंवारतेच्या वरच्या टोकाकडून होऊ शकते, त्याचप्रमाणे त्याचे गणन वारंवारतेच्या खालच्या टोकापासूनहि शक्य आहे.

वारंवारतेच्या खालच्या टोकापासून सुरुवात केल्यास ३६ हे पद तिसऱ्या संभागातच येते. परन्तु खालच्या ६ संभागांतून एकूण २९ पदे आहेत. म्हणजे तिसऱ्या संभागातील फक्त ७ पदे त्यात आणखी मिळविल्यास आपण ३६ व्या पदावर पोहोचतो.

वरीलप्रमाणेच ह्या ७ पदांची एकूण अर्हा त्रैराशिकाने $\frac{७×५}{१९}$ = १.८४ येते. खालच्या टोकापासून सुरुवात केली म्हणून तिसऱ्या संभागाची अधर अर्हा = २७.५ शिलिंग...त्यातून १.८४ शिलिंग वजा केल्यास २७.५० – १.८४ = २५.६६ शिलिंग ही ३६ व्या पदाची, म्हणजे मध्यका अर्हा येते ( वरीलप्रमाणेच ).

( ३ ) सूत्ररूपानेही मध्यका–निश्चिती शक्य आहे :

$$मा = ट_1 + \frac{\frac{डा}{२} - द_1}{द_2 - द_1} (ट_2 - ट_1) \ldots. \qquad (४)$$

ज्यात :—

मा = मध्यका.

$ट_2$ व $ट_1$ = मध्यका असलेल्या संभागाची वरची व खालची सीमा.

$द_2$ व $द_1$ = वरील संभाग सीमेतील पदांची अनुस्थिती.

वरील सूत्रात सारणी ५ मधील योग्य त्या अर्हा ठेवून,

$$मा = २२.५ + \frac{\frac{७२}{२} - २४}{४३ - २४} \times (२७.५ - २२.५)$$

$$= २५.६६ \text{ शिलिंग.}$$

**मध्यकाची लक्षणे :—**

( १ ) मध्यका हे स्थानपरत्वे येणारे माध्य होय.

( २ ) मध्यका—अर्हा ही एकूण पदसंख्येत बदल झाल्यासच बदलते. पदांच्या चरम अर्हेतील महत्त्वेमुळे मध्यकात बदल संभवत नाही.

( ३ ) मध्यकापासूनच्या विचलनांचा बीजीय योग हा न्यासातील कोणत्याही इतर बिन्दूपासून घेतलेल्या विचलनांच्या बीजीय योगापेक्षा कमी असतो.

( ४ ) श्रेणीतील केन्द्रीय अर्हा जर जवळ जवळ गुंफलेल्या असतील तर मध्यका–अर्हा ही सुद्धा अतिशय वैशिष्ट्यपूर्ण अशी असू शकते.

( ५ ) न्यासातील कोणतीही समसंभावी अर्हा ही मध्यका अर्हेपेक्षा कमी अथवा जास्त असणे शक्य आहे आणि म्हणूनच मध्यकास 'संभावी–अर्हा' असेही म्हणतात.

**मध्यकाचे उपयोग :—**

( १ ) मध्यका गणना सोपी व सरळ आहे.

( २ ) असामान्य पदांमुळे मध्यका अर्हा ही विरूपित होत नाहीं.

( ३ ) कोणत्याही श्रेणीचे मध्यका हे अधिक आदर्शवत असे माध्य होय; कारण श्रेणीतील चरम–अर्हांचा मध्यका–निश्चितीवर मुळीच परिणाम होत नाही.

( ४ ) बंटनातील शेवटच्या अर्हा–सीमा अनिश्चित स्वरूपाच्या असल्यासही मध्यका–निश्चिती शक्य आहे.

**मध्यकाचे तोटे :—**

( १ ) मध्यका हे समान्तर मध्यकेइतके प्रचारातले माध्य नाही.

( २ ) मध्यका संगणित करण्यापूर्वी न्यासातील पदांची त्यांच्या महत्त्वप्रमाणे रचना करावयास हवी.

( ३ ) समान्तर–मध्यकेपेक्षा मध्यकाचे प्रमाप–विभ्रम व संभावि–विभ्रम हे अधिक असतात.

( ४ ) मध्यका बीजीयरीत्या हाताळणे शक्य नाही.

## चतुर्थक, दशमक, शतमक

मध्यकामुळे बंटनाचे दोन समान भाग होतात. चतुर्थकामुळे बंटन चार समान भागांत विभाजित होते, तर दशमकामुळे तेच बंटन समान अशा दहा भागांत विभक्त होते. शतमकामुळे त्याचे शंभर समान भाग होतात. वरील माध्यामुळे बंटनाचे आणखी सूक्ष्म विश्लेषण शक्य होते

चतुर्थकांमुळे बंटनाचे चार समान भाग होतात; म्हणजे बंटनात एकूण तीन चतुर्थकच असतात. दुसऱ्या चतुर्थकामुळे बंटन दोन सारख्या भागात विभागले जाते; म्हणजे मध्यका व द्वितीय चतुर्थक हे एकच होत. प्रथम अथवा अधरचतुर्थकामुळे (तु$_{१}$) बंटन $\frac{१}{४} : \frac{३}{४}$ प्रमाणात विभागले जाते; तर तिसऱ्या अथवा उत्तर चतुर्थकामुळे ( तु$_{३}$ ) तेच बंटन ३।४ : १।४ ह्या प्रमाणात विभागले जाते.

शतमकामुळे बंटनाचे शंभर भाग होतात. प्रत्येक भागात फक्त एक–प्रतिशत पदे असतात. शतमकामुळे बंटनाचे अतिसूक्ष्म विभाजन होत असल्यामुळे हे माध्य साधारणतः ज्यात मुबलक पदे असतात अशा बंटनाच्या बाबतीतच वापरणे योग्य होय. त्यामुळे प्रत्यक्षात बहुधा काही विशिष्ट शतमकांचाच उपयोग केला जातो.

चतुर्थक, दशमक व शतमक यांची निश्चिती मध्यका–निश्चितीप्रमाणे आन्तर–गणनेद्वाराच करतात. सारणी १ मधील न्यासाकरिता —

(१) प्रथम चतुर्थक (तु$_{१}$) $= \frac{७२}{४} = १८ = १७.५ + \frac{१८-२}{२२} \times ५$

$= २१.१४$ शिलिंग.

(२) तृतीय चतुर्थक (तु$_{३}$) $= \frac{३\ डा}{४} = \frac{३\times७२}{४} = ५४$

$= २७.५ + \frac{५४-४३}{१४} \times ५$

$= ३१.४३$ शिलिंग.

(३) तृतीय दशमक (धा$_{३}$) $= \frac{३\ डा}{१०} = \frac{३\times७२}{१०} = २१.६$

$= १७.५ + \frac{२१.६-२}{२२} \times ५$

$= २५.०$ शिलिंग.

आन्तर–गणनेद्वारा मध्यका, तु$_{१}$ व तु$_{३}$ ची निश्चिती करता येते; त्याचप्रमाणे चित्रांकणाद्वारे सुद्धा ह्या माध्याची निश्चिती होऊ शकते. ( आ. १३ )

## भूयिष्ठक (भू) ....

वारंवारता बंटनाची य–अक्षावरील ती अर्हा जेथे बंटनातील सर्वात जास्त वारंवारता असतात त्यास भूयिष्ठक असे म्हणतात. ज्या संभागात हे भूयिष्ठक असते त्यास भूयिष्ठ–वर्ग म्हणतात. ह्या दृष्टीने पाहिल्यास कोणत्याही बंटनाचा सर्वसामान्य वर्ग हा या बंटनाचा भूयिष्ठ वर्गच होय. कारण त्याच वर्गात सर्वात अधिक वारंवारता केन्द्रित होतात.




आकृती १३ : कामगारांच्या साप्ताहिक भृतीचे संचयी–वारंवारता–बंटन.... त्यातील मध्यका व अधर आणि उत्तर चतुर्थकासह.

## भूयिष्ठक गणना

बंटनात ग्रथित न होऊ शकणाऱ्या न्यासाची भूयिष्ठक–निश्चिती सहज–साध्य नाही. भूयिष्ठक-निश्चिती मध्यकाप्रमाणे आन्तरगणन विधीनेच करतात. त्याकरिता वापरावयाचे सूत्र खालीलप्रमाणे होय.

$$भू = ट_1 + \frac{च_1 - च_0}{2च_1 - च_0 - च_2}(ट_2 - ट_1) \ldots \qquad (५)$$

ज्यात,

भू = भूयिष्ठक.

$ट_1$, $ट_2$ = भूयिष्ठ–वर्गाची खालची व वरची सीमा.

$च_0$, $च_1$, $च_2$ = भूयिष्ठ वर्गाच्या खालचा वर्ग, भूयिष्ठ–वर्ग, व भूयिष्ठ–वर्गाच्या वरच्या वर्गातील वारंवारता.

सारणी १ मधील न्यासाकरिता वरील सूत्राधारे येणारे भूयिष्ठक २१·८५ शिलिंग येते :

$$भू = १७·५ + \frac{२२ - २}{४४ - २ - १९}(२२·५ - १७·५)$$

= २१·८५ शिलिंग.

वारंवारता बंटन साधारण असंमितीय असेल तर त्यातील भूयिष्ठकाची निश्चिती खालील संबंधावरून निश्चित करतात.

भू = म − ३ ( म − मा ) ( ६ )

" संमित बंटनात समान्तर–मध्यक व भूयिष्ठक हे मध्यकाच्या परस्पर-विरुद्ध दिशेस असतात. तसेच समान्तर-मध्यकेचे मध्यकापासूनचे अन्तर, समान्तर-मध्यक व भूयिष्ठकातील अन्तराच्या $\frac{1}{3}$ असते. "

ह्या सिद्धान्ताचे अवलोकन, आणि वामायत व दक्षिणायत विषमता बंटनातील समान्तर-मध्यक, मध्यका व भूयिष्ठकाचे स्थान आकृति १४ व १५ वरून लक्ष्यात येईल.




आकृती १४ :— उपकाल्पनिक वामायत–विषमता–बंटनातील भूयिष्ठक ( भू ), मध्यका ( मा ) व समान्तर–मध्यकेची ( म ) अनुस्थिती.




आकृती १५:—उपकाल्पनिक दक्षिणायत विषमता वंटनात म, मा व भूचे स्थान.

वरील विधीशिवाय खालील प्रकारानेही भूयिष्ठक-निश्चिती होऊ शकते.

( अ ) वर्गण-विधीने.

( ब ) वारंवारता वंटनाच्या सरलनाने.

( क ) चलिष्णु माध्य द्वारा.

( ड ) गणितीय वक्र द्वारा.

**भूयिष्ठकाची लक्षणे :**

( १ ) भूयिष्ठक-अर्हा ही वंटनाची विशिष्ट अशी सर्वसाधारण केन्द्रीय अर्हा होय.

( २ ) भूयिष्ठक-अर्हा निश्चितीवर वंटनातील चरमपदांचा कसलाही परिणाम होत नाही.

( ३ ) भूयिष्ठक हे स्थिति-निदर्शक माध्य आहे.

भूयिष्ठकाचे उपयोग :

( १ ) भूयिष्ठक हे बंटनाचे नमुनेदार ( Typical ) वर्णनात्मक माध्य होय.

( २ ) मोजक्याच पदसंख्या असल्यास, भूयिष्ठक हे अवलोकनाने सुद्धा निश्चित करिता येते.

( ३ ) बंटनातील अर्हा मोजक्याच असल्या तर भूयिष्ठक-निश्चिती करिता अनुविन्यसनाची आवश्यकता नाही.

भूयिष्ठकाचे तोटे :

( १ ) मोजका न्यास असल्यासच भूयिष्ठक-निश्चिती सहजतेने होऊ शकते.

( २ ) बंटनात अत्यधिक अर्हा नसतील तर भूयिष्ठकाची सार्थकताही अनुल्लेखनीयच असते.

( ३ ) बंटनाची पदसंख्या कमी असल्यास त्यातून भूयिष्ठक–निश्चिती शक्य नाही, कारण अर्हांच्या पुनरावृत्तींची शक्यता अशा बंटनात नसते.

गुणोत्तर–मध्यक :

कोणत्याही ‘ ड ’–संख्यांच्या गुणाकाराच्या ‘ ड ’–वर्गमूळास त्या संख्येचा गुणोत्तर–मध्यक असे म्हणतात. सूत्ररूपाने ह्याची मांडणी अशी :

$$ण = \sqrt[ड]{क_१ . क_२ . क_३ \cdot \ldots क_ड} \qquad (७)$$

२, ४ व ८ चा गुणोत्तर – मध्यक असा :

$$ण = \sqrt[३]{२ \times ४ \times ८} = \sqrt[२]{६४} = ४$$

छेदाचा उपयोग केल्यास गुणोत्तर–मध्यक गणना सुगम होते.

$$छे. ण = \frac{छे. क_१ + छे. क_२ + \ldots + छे. क_ड}{डा} \qquad (८)$$

गुणोत्तर–मध्यकाची लक्षणे :

( १ ) गुणोत्तर मध्यक ही संगणित अर्हा असून बंटनातील अर्हांच्या महत्त्वर ती अवलंबून असते.

( २ ) गुणोत्तर–मध्यक हे समान्तर–मध्यकेप्रमाणे बंटनातील चरम पद–अर्हांमुळे विशेष विरूपित होत नाही.

( ३ ) कोणत्याही श्रेणीचे गुणोत्तर–मध्यक हे त्या श्रेणीच्या समान्तर–मध्यकेपेक्षा लहान असते.

**गुणोत्तर-मध्यकाचे उपयोग :**

गुणोत्तर-मध्यक हे समान्तर-मध्यकेपेक्षा अधिक चांगले व नमुनेदार असे माध्य होय. कारण, बंटनातील चरम अर्हांचा त्याच्यावर विशेष परिणाम होत नाही.

( २ ) गुणोत्तर-मध्यक हे बीजीयरीत्या हाताळता येते.

( ३ ) गुणोत्तर-मध्यक हे देशनांक-गणनेत विशेष उपयोगी आहे.

**गुणोत्तर-मध्यकाचे तोटे :**

( १ ) गुणोत्तर-मध्यक हे माध्य विशेष प्रचारातले असे माध्य नाही.

( २ ) गुणोत्तर-मध्यकाची गणनाही बव्हंशी जड व क्लिष्ट असते.

( ३ ) बंटनातील काही अर्हा ऋण असल्यास अथवा त्यातील एखादे पद शून्य असेल तर गुणोत्तर-मध्यक निश्चिती शक्य नसते.

**हरात्मक-मध्यक ( ह ) :**

कोणत्याही श्रेणींचे हरात्मक-मध्यक हे त्या श्रेणीच्या गुणोत्तर-मध्यकाचा व्युत्क्रम होय. त्याचे सूत्र असे :

$$\frac{१}{ह} = \frac{\frac{१}{क_१} + \frac{१}{क_२} + \frac{१}{क_३} + \dots + \frac{१}{कड}}{डा} \qquad (९)$$

हरात्मक मध्यकाचा उपयोग अर्हांचा माध्य काढण्याकरिता करतात.



# प्रकरण ४

# वारंवारता बंटन–अपकिरण व विषमता

### अपकिरण

वारंवारता बंटन विश्लेषणात बंटनाचे माध्य अथवा केन्द्रीय–अर्हेची निव्वळ माहिती घेऊनच फायदा नाही, तर त्या बंटनातील पदांची केन्द्रीय अर्हेपासूनच्या विचलनाची मात्राही समजावयास हवी. बंटनातील विचलनाची ही मात्रा अत्याधिक असेल तर केन्द्रीय अर्हेस त्या न्यासाची निदर्शक अर्हा मानणें विशेष योग्य होणार नाही.

माध्यापासूनचे हे विचलन मोजता यावे म्हणून योग्य असा इयत्तात्मक–मापांक–गणनविधी उपयोगात आणावयास हवा.

### विस्तार :

न्यासातील अत्युच्च व अधर अर्हांतील तफावतीस विस्तार असे म्हणतात. सर्वांत सोपे असे हे एक अपकिरणमापांक होय. कोणत्याही श्रेणीविषयी त्यापासून प्रायमिक अशी कल्पना करिता येते. खाली दिलेल्या 'अ' व 'ब' श्रेणीचा विस्तार ३० प्रतिशत आहे. त्यातील अपकिरण मात्र सारखे नाहीत.

१० विद्यार्थ्यांचे परीक्षेतील गुण :

| विद्यार्थी क्रमांक | परीक्षेतील प्रतिशत गुण | |
|---|---|---|
| | अ–परीक्षा | ब–परीक्षा |
| १ | ६०% | ६०% |
| २ | ६० | ६५ |
| ३ | ६१ | ७० |
| ४ | ६३ | ७२ |
| ५ | ६५ | ७५ |
| ६ | ६५ | ७८ |
| ७ | ६६ | ८० |
| ८ | ६७ | ८५ |
| ९ | ६८ | ८८ |
| १० | ९० | ९० |

### विस्ताराची लक्षणे :

(१) गोचर(विस्तार) हे सोपे व सहज समजणारे असे अपकिरण–मापांक होय.

(२) त्याची गणनाहि सहजसाध्य आहे.

(३) त्याची अर्हा ही फक्त दोनच पदांवर अवलंबून असते, न्यासातील अत्युच्च व अधर अर्हा.

( ४ ) ह्या दोन पदांव्यतिरिक्त न्यासांतील इतर पदांची माहिती असावीच असे नाही.

( ५ ) गिव्वळ ह्या दोन पदांवरच गोचर अवलंबून असल्यानें, एखादेवेळेस ही दोन पदे अगदीच भिन्न व अप्रमाणबद्ध असली तर विस्तार अत्याधिक विरूपित होते.

**मध्यक विचलन :**

बंटनातील अत्युच्च व अधर अर्हेवरच विस्तार हे बंटनाचे अपकिरण–मापक अवलंबून असते. अर्थात् त्यामुळे बंटनातील इतर पद–अर्हांचा ह्या अपकिरण–मापकांशी संबंध येत नाही. आणि म्हणूनच बंटनातील प्रत्येक पद–अर्हा विचलनाचा ज्याशी संबंध आहे, अशा अपकिरण–मापकांची आवश्यकता अधिकच भासते. मध्यक–विचलन हे अशा तऱ्हेचे अपकिरण–मापांक होय.

बंटनाच्या केन्द्रीय–अर्हेपासून ( समान्तर–मध्यक अथवा मध्यका ) बंटनातील प्रत्येक पदाच्या विचलनाचा माध्य काढल्यास त्यास मध्यक विचलन असे म्हणतात.

सारणी १ मधील साप्ताहिक भृतीच्या न्यासाकरिता हे मध्यक–विचलन खालीलप्रमाणें काढावे.

### सारणी ६

मध्यक विचलनाचे गणन.

एका फॅक्टरीतील कामगारांस मिळणाऱ्या साप्ताहिक–भृतीकरिता

| साप्ताहिक–भृती<br>१ | केन्द्रीय भृती–अर्हा ( ठ )<br>२ | कामगारांची वारंवारता ( च )<br>३ | 'म' पासून विचलन ( घ )<br>४ | ( चघ )<br>५ |
|---|---|---|---|---|
| १२.५–१७.५ | १५ | २ | १२.८५ | २५.७० |
| १७.५–२२.५ | २० | २२ | ७.८५ | १७२.७० |
| २२.५–२७.५ | २५ | १९ | २.८५ | ५४.१५ |
| २७.५–३२.५ | ३० | १४ | २.१५ | ३०.१० |
| ३२.५–३७.५ | ३५ | ३ | ७.१५ | २१.४५ |
| ३७.५–४२.५ | ४० | ४ | १२.१५ | ४८.६० |
| ४२.५–४७.५ | ४५ | ६ | १७.१५ | १०२.९० |
| ४७.५–५२.५ | ५० | १ | २२.१५ | २२.१५ |
| ५२.५–५७.५ | ५५ | १ | २७.१५ | २७.१५ |
| | | ७२ | | ५०४.९० |

$$म = २७.८५ \quad म.\ वि.\ (रि) = \frac{५०४.९०}{७२} = ७.०१२५ \text{ शिलिंग.}$$

वरील उदाहरणांवरून लक्ष्यात येईल की, मध्यक-विचलन गणनेत बीजाय चिन्हांचा विचार करीत नाही.

**मध्यक-विचलनाची लक्षणे :**

( १ ) मध्यक-विचलन अर्हा ही श्रेणीतील प्रत्येक पदाच्या अर्हेवर अवलंबून असते.

( २ ) बंटनाचे मध्यक-विचलन हे बंटनातील समान्तर मध्यक अथवा मध्यकापासूनही काढल्यास चालते.

( ३ ) मध्यकापासून घेतलेली सर्वसाधारण विचलने मात्र अल्पिष्ठ असतात.

मध्यक-विचलन गणनेत खालील सूत्राचा उपयोग करतात.

$$रि = \frac{यो\ (चघ)}{डा} \qquad (१०)$$

रि = मध्यक विचलन.

यो ( चघ ) = बंटनातील वारंवारता ( च ) आणि बंटनातील प्रत्येक पद-अर्हेचे समान्तर-मध्यक अथवा मध्यकापासूनचे विचलन ( घ ) चा एकूण योग.

डा = बंटनातील एकूण पदसंख्या.

वरील विधीचा थोडक्यात सारांश असा:—

( १ ) संभागान्तरालातील मध्यबिन्दूचे बंटनाच्या समान्तर-मध्यक अथवा मध्यकापासूनचे विचलन काढा.

( २ ) ह्या विचलनांचा व संबंधित वारंवारतेचा गुणाकार करा.

( ३ ) आलेल्या गुणाकाराच्या एकूण योगास बंटनाच्या एकूण पद-संख्येने भागा.

येणारा परिणाम त्या बंटनाची ' रि ' = मध्यक विचलन होय.

ह्याशिवाय आणखी सरल व सोपी रीती खालीलप्रमाणे:—

( अ ) कोणतेही एक काल्पित-माध्य घ्या. हे काल्पित-माध्य बंटनाचे समान्तर-मध्यक अथवा मध्यका ज्या संभागान्तरालात पडते, तेच धरल्यास बरे !

( ब ) ह्या काल्पिक-माध्यापासून प्रत्येक संभागान्तरालातील मध्य-बिन्दूचे विचलन काढा; व मग वरील प्रकारेच बंटनाचा म. वि. काढा.

## प्रमाप–विचलन

बीजीय चिन्हांचा योग्य तो परामर्श न घेता केलेली गणना ही शास्त्रशुद्ध नव्हे ! त्याकरिता ह्या चिन्हांचा योग्य असा परामर्श घेऊन परिशुद्ध अशी गणना फक्त प्रमाप–विचलन गणनेतच केली जाते. प्रमाप–विचलनाची गणना करताना न्यासातील प्रत्येक पदाचे समान्तर–मध्यकेपासूनचे जे विचलन येते, त्या विचलनाच्या वर्गांचा योग घेऊन त्या योगाच्या माध्याचे वर्गमूळ काढतात. समान्तर–मध्यकेपासून घेतलेली ही विचलने उपरिनिर्दिष्ट परिस्थितीत अलिप्त असतात.

प्रमाप–विचलनाचे सूत्र असे :—

$$\therefore \text{प्र.च. (धि)} = \sqrt{\text{यो. घ}^2 / \text{डा}} \qquad (११)$$

अवर्गीत न्यासाकरिता ही गणना खालीलप्रमाणे करावी.

### सारणी–७

प्रमाप विचलन गणना : अवर्गीत न्यास.

एप्रिल १८, १९३४ रोजी जॉइंट स्टॉक बँकेच्या बॉण्डची किंमत.

| बँका (१) | प्रतिशत अर्ध (२) | सराफकट्ट्यावरील किंमत (३) | म=७०.५ पासून 'घ' (४) | $\text{घ}^2$ (५) |
|---|---|---|---|---|
| अटलांटा | ५% | ७१ | ०.५ | ०.२५ |
| बर्लिंगटन | ,, | ६५ | –५.५ | ३०.२५ |
| चिकागो | ,, | ४१ | –२९.५ | ८७०.२५ |
| डलस | ,, | ८० | ९.५ | ९०.२५ |
| डेनवर | ,, | ७३ | २.५ | ६.२५ |
| डेसमोनेस | ,, | ७८ | ७.५ | ५६.२५ |
| फोर्ट वेन | ,, | ७१ | ०.५ | ०.२५ |
| फर्स्ट कॅरोलिना | ,, | ६९ | –१.५ | २.२५ |
| फर्स्ट टेक्सास | ,, | ७१ | ०.५ | ०.२५ |
| लिंकोल्न | ,, | ७९ | ८.५ | ७२.२५ |
| लुईसव्हिले | ,, | ७५ | ४.५ | २०.२५ |
| न्यूयॉर्क | ,, | ७३ | २.५ | ६.२५ |
| | | एकूण ८४६ | ० | ११५५.०० |
| | | माध्य ७०.५ | – | ९६.२५ |

मूळ : वॉल स्ट्रीटचे जर्नल :

$$\text{धि} = \sqrt{\text{योः}\ \text{घ}^{2} / \text{डा.}} = \sqrt{९६.२५}$$

$$= ९.८१.$$

श्रेणीतील पदसंख्या बरीच अधिक असेल तर बंटनात त्याची रचना करून मगच त्या न्यासाचे प्रमाप विचलन काढणे हितावह असते. अशा वेळेस वरील सूत्र थोड्याफार फरकाने उपयोगात येते, ते असे:

$$\text{प्र. च. (धि)} = \sqrt{\text{यो(च·घ}^{2}\text{)} / \text{डा}} \ldots \qquad (१२)$$

वर्गित न्यासाकरिता पण दीर्घ रीतीप्रमाणें धि–ची गणना खालीलप्रमाणे करावी.

## सारणी–८

प्रमाप विचलन गणना: वर्गित न्यास.

दीर्घ रीतीप्रमाणे

अमेरिकेतील ५०,००० लोकसंख्येवरील १५१ शहरांकरिता कर चुकविणाऱ्यांची प्रतिशतता.

| कर चुकविणारे प्रतिशत १ | मध्यबिंदू (ठ) २ | शहराची वारंवारता (च) ३ | म=२८.२६ पासून (घ) ४ | घ² ५ | चघ² ६ |
|---|---|---|---|---|---|
| ० – ४.९९ | २.५० | १ | –२५.७६ | ६६३.५७७६ | ६६३.५७७६ |
| ५ – ९.९९ | ७.५० | १२ | –२०.७६ | ४३०.९७७६ | ५१७१.७३१२ |
| १०–१४.९९ | १२.५० | १९ | –१५.७६ | २४८.३७७६ | ४७१९.१७४४ |
| १५–१९.९९ | १७.५० | २४ | –१०.७६ | ११५.७७७६ | २७७८.६२२४ |
| २०–२४.९९ | २२.५० | १९ | –५.७६ | ३३.१७७६ | ६३०.३७४४ |
| २५–२९.९९ | २७.५० | १९ | –०.७६ | ०.५७७६ | १०.९७४४ |
| ३०–३४.९९ | ३२.५० | १६ | ४.२४ | १७.९७७६ | २८७.६४१६ |
| ३५–३९.९९ | ३७.५० | १५ | ९.२४ | ८५.३७७६ | १२८०.६६४० |
| ४०–४४.९९ | ४२.५० | १२ | १४.२४ | २०२.७७७६ | २४३३.३३१२ |
| ४५–४९.९९ | ४७.५० | ८ | १९.२४ | ३७०.१७७६ | २९६१.४२०८ |
| ५०–५४.९९ | ५२.५० | २ | २४.२४ | ५८७.५७७६ | ११७५.१५५२ |
| ५५–५९.९९ | ५७.५० | ० | २९.२४ | ८५४.९७७६ | ० |
| ६०–६४.९९ | ६२.५० | २ | ३४.२४ | ११७२.३७७६ | २३४४.७५५२ |
| ६५–६९.९९ | ६७.५० | २ | ३९.२४ | १५३९.७७७६ | ३०७९.५५५२ |
| | | १५१ | | | २७५३७.०१७६ |

मूळ :–डून व ब्रॅडस्ट्रीटच्या नगरपालिकांचे परीक्षण ( Review ).

$$\text{धि} = \sqrt{\frac{\text{यो}(\text{चघ}^2)}{\text{डा}}} = \sqrt{\frac{२७५३७\cdot०१७६}{१५१}} = १३\cdot५० \%$$

सारणी ८ मधील गणना ही अतिशय क्लिष्ट व कंटाळवाणी होते. ह्याकरिता नेहमी-प्रमाणे कल्पित माध्याचा उपयोग करून प्रमाप–विचलन काढणे केव्हाहि सोपे व श्रेयस्कर होय. कल्पित माध्यावरून प्रमाप–विचलन काढताना वापरावयाचे सूत्र असे—

$$\text{प्र. च. (धि)} = \text{श} \times \sqrt{\frac{\text{यो च (घ)}^2}{\text{डा}} - \left(\frac{\text{यो चघ}}{\text{डा}}\right)^2} \quad (१३)$$

ज्यात : धि = प्रमाप–विचलन.
श = संभागान्तराल.
च = वारंवारता.
घ = पदाचे विचलन.
डा = एकूण पदे.

### सारणी–९

प्रमाप विचलन गणना : वर्गीत न्यास.

लघु–रीती द्वारा : कल्पित–माध्यावरून.

एका फॅक्टरीतील कामगारांस मिळणाऱ्या साप्ताहिक–भृतीकरिता.

| (१) केन्द्रिय भृती (ठ) | (२) वारंवारता (च) | (३) क. मा. विचलन (घ) | (४) चघ | ५ $\text{चघ}^2$ |
|---|---|---|---|---|
| शि. १५ | २ | –२ | – ४ | ८ |
| २० | २२ | –१ | –२२ | २२ |
| २५ | १९ | ० | ० | ० |
| ३० | १४ | +१ | +१४ | १४ |
| ३५ | ३ | +२ | + ६ | १२ |
| ४० | ४ | +३ | +१२ | ३६ |
| ४५ | ६ | +४ | +२४ | ९६ |
| ५० | १ | +५ | + ५ | २५ |
| ५५ | १ | +६ | + ६ | ३६ |
| | ७२ | | +४१ | २४९ |

$$\text{धि} = ५\sqrt{\frac{२४९}{७२} - \left(\frac{४१}{७२}\right)^2}$$

$$= ५\sqrt{\frac{१,६२४७}{५१८४}} = ८\cdot८५ \text{ शिलिंग}$$

प्रमाप–विचलनाची लक्षणे.

( १ ) प्रमाप–विचलनाची अर्हा ही न्यासातील प्रत्येक पद–अर्हेनुसार बदलते.

( २ ) प्रमाप–विचलन काढताना मध्यक–विचलनापेक्षाही अधिक भर न्यासातील चरमसीमेवर असतो; कारण, प्रमाप–विचलनाच्या संगणनेत सर्वच अर्हांचा वर्ग घ्यावा लागतो.

( ३ ) घंटाकार वक्रातील मध्यक – विचलन हे प्रमाप – विचलनाच्या ०·७९७९ पट असते. साधारण विषम बंटनातून मात्र वरील संबंध थोड्याफार फरकाने आढळून येतो.

( ४ अ ) प्रसामान्य बंटनातील य–अक्षावर समान्तर मध्यकेच्या दोन्ही बाजूंस जर एक प्रमाप–विचलन एवढे अन्तर घेतले तर त्या सीमेत न्यासाच्या एकूण अर्हांच्या ६८·२६ प्रतिशत अर्हा असल्याचे आढळून येईल.

( ब ) — २ प्रमाप–विचलन एवढे अन्तर घेतले तर ९५·४६ प्रतिशत अर्हा त्या सीमेत आढळतील.

( क ) — आणि हेच अन्तर ३ 'धि' केल्यास त्यात ९९·७३ प्रतिशत पद–अर्हा आढळतील.

वरील प्रतिशतता फक्त प्रसामान्य बंटनाच्या बाबतीतच खरी असल्याचे आढळून येते. साधारण विषम बंटने असल्यास ही प्रतिशतता त्या अंकाच्या जवळपास कोठेतरी आढळून येते. नेहमीच्या कामाकरिता मग त्याचा उल्लेख खालील-प्रमाणे करावा.

"प्रसामान्य बंटनातून ± १ धि एवढ्या सीमेत ६८ प्रतिशत; ± २ धि अंतरांत ९५ प्रतिशत; व ± ३ धि अन्तरात जवळजवळ सर्वच ( म्हणजे ९९·७) अर्हा सामाविलेल्या असतात." ( आकृती १६ )

( ५ ) घंटाकार अथवा साधारण विषम वक्रातील समान्तर–मध्यकेच्या दोहो बाजूंकडील ३-धि अन्तरात सर्वच ( ९९·७ ) अर्हा येतात; त्याअर्थी प्रमाप विचलनाची अर्हा ही त्या न्यासातील विस्ताराच्या $\frac{1}{6}$ असावयास हवी. ( साधारणत: )

### चतुर्थक विचलन

वारंवारता बंटनातील अपकिरणाचा अंश ज्या प्रमाणात वाढतो त्या प्रमाणात बंटनाच्या चतुर्थकातील अंतरहि वाढत जाते किंवा चतुर्थकातील अंतर ज्या प्रमाणात कमीजास्त होते त्याच प्रमाणात वारंवारता बंटनातील अपकिरणही कमी-जास्त होते. ह्याच कारणास्तव वारंवारता बंटनातील अपकिरण मापांकाचे चतुर्थ-कातील हे अन्तर आधार म्हणून मानले जाते.




आकृति १६ – प्रसामान्य–बंटनातील समान्तर–मध्यकेपासून ± १ धि अन्तरात सामावणारे प्रतिशत क्षेत्र.

वारंवारता बंटन संपूर्ण संमितीय असेल तर मध्यकापासूनचे त्याच्या दोन चतुर्थकातील अन्तर सारखे असते. मध्यका तथा प्रथम किंवा तृतीय चतुर्थकातील हे अन्तर प्रथम ते तृतीय चतुर्थकालातील अन्तराच्या निम्मे असते. ह्या अन्तरासच चतुर्थक विचलन असे म्हणतात. बंटनातील अपकिरण मापनास्तव त्याचा उपयोग होतो.

$$\text{तु. वि.} = \frac{\text{तु}_{३} - \text{तु}_{१}}{२} \qquad (१४)$$

तु. वि. = चतुर्थक विचलन.

$\text{तु}_{३}$ = तृतीय चतुर्थक.

$\text{तु}_{१}$ = प्रथम चतुर्थक.

सारणी १ मधील न्यासाकरिता तु. वि. असा :—

$$\text{तु. वि.} = \frac{३१·४३ - २१·१४}{२}$$

बंटनातील चतुर्थक अंतराच्या मध्य–बिन्दूपासून दोहो बाजूंस १ तु. वि. एवढे अन्तर धरले तर त्या अन्तरात बंटनातील ५० प्रतिशत अर्हा येतात. ह्या मध्यबिन्दूस "सा" असे म्हणतात. संमित बंटनात "सा" ची अर्हा व मध्यका–अर्हा एकच असते.

आतापर्यंत वर्णन केलेले अपकिरण–मापांक हे निरपेक्ष–मापांक होत. त्यापासून प्राप्त होणाऱ्या अर्हा ह्या तौलनिकदृष्ट्या विशेष उपयोगाच्या नाहीत. उदाहरणार्थ, पुण्याच्या एकाच शाळेतील विद्यार्थ्यांच्या वयाच्या 'धि' ची त्याच शाळेतील विद्यार्थ्यांच्या बुद्धि–अंकाच्या 'धि' शी तुलना करिता येणार नाही. कारण ह्या दोन्ही प्रमाप–विचलनांच्या मापनात उपयोगात आणलेले एकक अगदी भिन्न आहेत.

त्याचप्रमाणे ज्या माध्यापासून ही विचरणे मोजण्यात येतात, त्या माध्याच्या परिमाणाशीही ह्या अपकिरण मापांकाची तुलना करावयास हवी. ज्याची सर्वसाधारण किंमत १० रु. आहे, पण ज्यातील विचरण रु. ५ आहे, अशा शेअरचा विस्तार व अर्हा ही ज्या शेअरची सर्वसाधारण किंमत १०० रु. आहे, पण ज्यातील विचरण मात्र वरीलप्रमाणेच फक्त रु. ५ आहे, त्याच्याबरोबर होणार नाही.

अशी तुलना शक्य व्हावी म्हणून प्रमाप–विचलनाला त्याच्या समान्तर मध्यकेने भागून त्याचे मग प्रतिशततेत रूपांतर करावे. अशा तऱ्हेने प्राप्त होणाऱ्या मापांकास '**विचरण–मापांक**' असे म्हणतात.

सारणी १ मधील न्यासाकरिता हे विचरण–मापांक ३१·७९ प्रतिशत येते.

$$\text{वि. पा. (फा)} = \frac{\text{धि}}{\text{म}} \times १०० \qquad (१५)$$

$$\text{फा} = \frac{८·८५}{२७·८५} \times १००$$

$$= \frac{८८५}{२७·८५} = ३१·७९\ \%$$

**विषमता** माप

वारंवारता बंटनातील असंमिती मोजण्यासाठी विषमता–मापांकाचा उपयोग होतो.

संमित–बंटनात समान्तर–मध्यक, मध्यका व भूयिष्ठकाच्या अर्हा सारख्याच असतात. असंमितीय बंटनात वरील अर्हा निरनिराळ्या असतात. समान्तर–मध्यक हे बंटनाच्या चरम सीमेतील पद–अर्हांमुळें विशेष विरूपित होते, व म्हणून भूयिष्ठका–

पासून ते अधिक दूर जाते. भूयिष्ठक मात्र बंटनातील असामान्य अशा पद–अर्हांमुळे विशेष विरूपित होत नाहीं. समान्तर–मध्यकेत व भूयिष्ठकात जेवढे जास्त अन्तर असेल, त्या प्रमाणात बंटनातील विषमता आधिक असे समजावे.

समान्तर–मध्यकेतील व भूयिष्ठकातील हे अन्तर विषमता–मापकांसाठी उपयोगात येते. हे अन्तर ज्या प्रमाणात कमीजास्त असेल त्याच प्रमाणात बंटनातील विचरणही कमीजास्त असते. विषमता मापांक हे विचरण मापांकाप्रमाणे तुलनेसाठी वापरतात. अर्थात मग निरनिराळ्या एककाचा प्रश्नही अशा वेळेस विषमता मापांकाच्या बाबतीत तुलना करताना उद्भवतो. याकरिता दोन माध्यातील ह्या अन्तरास प्रमाप–विचलनाने भागावे.

$$(\text{ष}_1)\ \text{वि. म.} = \frac{\text{म} - \text{भू}}{\text{धि}} \qquad (१६)$$

साधारण असंमित बंटनातून समान्तर–मध्यक आणि भूयिष्ठकातील अन्तर हे त्याच बंटनातील समान्तर–मध्यक आणि मध्यकातील अन्तराच्या तिप्पट असते. यासाठी वरील सूत्र खालीलप्रमाणेही लिहिता येईल.

$$(\text{ष}_1)\ \text{वि. म.} = \frac{३\,(\text{म} - \text{मा})}{\text{धि}} \qquad (१७)$$

संमित बंटनात समान्तर–मध्यक, मध्यका आणि भूयिष्ठकाच्या अर्हा समान असतात. अशा परिस्थितीत विषमता–माप शून्य असते.

दाक्षिणायत–विषमता–बंटनातून समान्तर–मध्यक अर्हा ही इतर अर्हांपेक्षा आधिक असते. त्यामुळे (म–भू) ही अर्हाही आधिक अथवा धन असेल. अर्थात त्यामुळे वि. म. नेहमीच धन असणार. वामायत–विषमता–बंटनातून समान्तर–मध्यक अर्हा ही इतर माध्यांच्या अर्हांपेक्षा कमी असते; त्यामुळे अशा बंटनाचे वि. म. हे नेहमीच ऋण असते.

वारंवारता बंटनातील चतुर्थकांच्या स्थानानुसार सुद्धा विषमता मापांकाची मोजणी शक्य आहे. संमित बंटनातील प्रथम व तृतीय चतुर्थक हे समान अंतरावर असतात. बंटन जसजसे विषम होते तसतसे हे अन्तरही असमान होते. आत्यंतिक असंमित अशा बंटनातून तर चतुर्थक व मध्यकातील ह्या अंतरात तीव्र अशी तफावत आढळून येते. ह्या तफावतीस अथवा अन्तरास तु. वि. ने भागल्यास बंटनाचा वि. म. प्राप्त होतो.

$$(\text{ष}_2)\ \text{वि. म.} = \frac{(\text{तु}_3 - \text{मा}) - (\text{मा} - \text{तु}_1)}{\text{तु. वि.}} \qquad (१८)$$

संमित बंटनात वरील वि. म. शून्य असतो. दाक्षिणायत–विषमता–बंटनातून $तु_३$ ची क्षहा $तु_२$ ( मा ) पेक्षा अधिक असल्याने असल्या बंटनाचा वि. म. अधिक म्हणजे धन असतो. वामायत–विषमता–बंटनात $तु_२$ ची अहा $तु_३$ पेक्षा अधिक असते; म्हणून अशा प्रकारच्या सर्व बंटनाचा वि. म. नेहमी ऋण असतो.

सारणी १ मधील न्यासाकरिता $ष_१$ व $ष_२$ चे मापन खालीलप्रमाणे:—

$$ष_१ = \frac{२७.८५-२१.८५}{८.८५}$$
$$०.६८$$

आणि—

$$ष_२ = \frac{३१.४३ + २१.१४ - ५१.३२}{३१.४३ - २१.१४}$$
$$= \frac{१.२५}{१०.२९} = ०.१२$$

**ककुद्–वक्रता—**

वारंवारता बंटनाचे त्याच्या शिखर–उंचीवर अवलंबित असे आणखी एक मापांक आहे. त्यास ककुद्–वक्रता असे म्हणतात. प्रसामान्य–बंटनापेक्षा सदर शिखर–उंची अधिक असेल तर त्या बंटनास कुट–ककुद्मी असे म्हणतात. हाच अंश कमी असेल तर त्या बंटनास चिपिट–ककुद्मी असे म्हणतात. प्रसामान्य बंटनाइतकाच शिखर–उंचीचा हा अंश असेल तर त्यास मध्य–ककुद्मी असे म्हणतात. हे बंटनाचे वक्रता–मापन खालील सूत्राद्वारे काढता येते.

$$क = आ - ३$$

ज्यात

$$आ = \frac{य.या^४}{डा} + \left(\frac{य.या}{डा}\right)^२$$

( पहा : प्रकरण १५ )

# प्रकरण ५

# कालिक–श्रेणी–विश्लेषण

## (प्रवृत्ती)

इयत्तात्मक न्यासाची त्याच्या कालक्रमानुसार मांडणी केल्यास तयार होणाऱ्या श्रेणीस **कालिक–श्रेणी** असे म्हणतात.

कालिक श्रेणी विश्लेषणात त्या श्रेणीतील एका विवक्षित कालखंडात होणारे जे अनेक बदल असतात त्यांचे विवरण व मापन मुख्यत्वे असते. हे बदल खालील प्रकारचे होत :—

**सुदीर्घकालीन प्रवृत्ती :** इयत्तात्मक न्यासातील दीर्घ कालातील आरोह अथवा अवरोह. हा दीर्घ कालखंड साधारणतः दहा वर्षांपेक्षा कमी असू नये.

२. **आर्त्तव विचरण :** न्यासांतर्गत बारा महिन्यांच्या कालखंडातून आढळून येणारी सर्वसाधारण नियमित गती. ही गती वर्षागणिक असून ऋतूतील बदला-मुळे संभवते.

३. **चक्रिक उच्चावचन :** सदर उच्चावचनाची गती ही भरभराटीपासून मंदी ते सुधारणा व पुन्हा भरभराटीच्या कालखंडापर्यंतच्या चक्रिक रूपात मोजली जाते. ही गती त्यातील अवसर, वेळ व त्याचा वेग ह्यांवर अवलंबून असते.

४. **समसंभावी विचरण :** महायुद्ध, संकटे, संप, सामाजिक कल्पना आदीसारख्या अनियमित क्षुब्धतेमुळे उत्पन्न होणाऱ्या विचरणास समसंभावी विचरण असे म्हणतात.

### प्रवृत्ति–मापन

कालिक–श्रेणीतील प्रवृत्तीच्या मापनार्थ खालील चार विधींचा उपयोग होतो.

( अ ) मुक्तबाहू.
( ब ) अर्ध–माध्य.
( क ) चलिष्णु–माध्य.
( ड ) अल्पतम वर्गरीती.

### विधि–दर्शन :

१. **मुक्तबाहू**:—न्यासाच्या काढलेल्या चित्रांकणात एक रेषा अशा रीतीने बसविण्यात येते की, ती रेषा त्या न्यासातील दीर्घ अशा कालखंडातील गतिविधी स्पष्ट करते. ( आकृती १७ )




आकृती १७ : १९१९ ते १९३२ दरम्यानचे यू. एस्. ए. तील
रोजची सर्वसाधारण वीज–निर्मिती.

( मुक्तबाहू–रेषेद्वारा प्रवृत्तिदर्शन. )

ही रेषा काढताना स्वानुभवावर अधिक विसंबून राहावे लागते. प्रयत्नांअंती सदर रेषा गणितीय रेषेइतपत जुळते. तरी पण त्यात वैयक्तिक मताधिक्य जास्त असल्यानें ही संपूर्णतया अधिक विश्वासार्ह म्हणून मानता येणार नाही. मुक्तबाहू विधी ही इतर विधीच्या मानाने अतिशय सोपी असली व सराव असणारा सांख्यिक बरेच वेळा गणितीय समीकारांऐवजी तिचा उपयोग करीत असला तरी त्याकरिता दीर्घ अशा अनुभवाची आवश्यकता असते. त्यामुळे तिचा उपयोग नवशिक्यांस योग्य नाहीं.

**२. अर्ध–माध्य :** ह्या विधीप्रमाणे संपूर्ण न्यास दोन समान भागांत विभजित करावा. प्रत्येक भागाकरिता एक माध्य शोधून काढा. हा माध्य त्या कालखंडाच्या मध्यभागी चित्रित अथवा प्रांकित करून त्या दोन्ही बिन्दूतून जाणारी एक सरळ रेषा काढा. ( आकृति १८ )




आकृती १८ : १९१४ ते १९३१ दरम्यान संयुक्त संस्थानातील
सिगारेटचा खप = ( अर्ध–माध्य रेषेद्वारा प्रवृत्तिदर्शन. )

आकृती १८ मध्ये ३८·२५ व ९५·४५ हे दोन बिन्दू १९१४ ते १९२२ व १९२३ ते १९३१ ह्या दोन कालखंडाच्या मध्यभागी म्हणजे १९१८ व १९२७ वर प्रांकित केले; व मग त्या दोन्ही बिंदूतून जाणारी 'अब' ही सरळ रेषा पट्टीने काढली.

ही रीती अत्यंत सोपी असून तीत वैयक्तिक मतप्रणालीचा अंशही नसतो. परंतु सदर रीतीत उपयोगात येणारे समान्तर–मध्यक हे माध्य न्यासातील चरम पद–अर्हांमुळे विरूपित होणारे असल्याने संप आदीसारख्या अनैसर्गिक कारणाने उद्भवणाऱ्या समसंभावी विचरणातील वरील रीतीने प्राप्त होणारी प्रवृत्ति–रेषा असत्य भासण्याचा संभव आहे. त्याप्रमाणे ही रीती फक्त सरलरेखीय प्रवृत्ती-दर्शनार्थच उपयोगात येऊ शकते.

## सारणी–१०

### प्रवृत्तीचे–संगणन ( अर्ध–माध्य विधी )

१९१४–१९३१ ह्या कालखंडातील यू. एस. ए. मध्ये झालेला सिगारेटचा खप

| वर्ष : | खप ( कोटीत ) | योग | समान्तर–मध्यक |
|---|---|---|---|
| १९१४ | १६.८६ | | |
| १९१५ | १७.९६ | | |
| १९१६ | २५.२९ | | |
| १९१७ | ३५.३३ | | |
| १९१८ | ४६.६६ | ३४४.२८ ÷ ९ = | ३८.२५ |
| १९१९ | ५३.१२ | | |
| १९२० | ४४.६२ | | |
| १९२१ | ५०.८७ | | |
| १९२२ | ५३.५७ | | |
| १९२३ | ६४.४५ | | |
| १९२४ | ७०.०१ | | |
| १९२५ | ७९.९६ | | |
| १९२६ | ८९.४५ | | |
| १९२७ | ९७.१८ | ८५९.०८ ÷ ९ = | ९५.४५ |
| १९२८ | १०५.९२ | | |
| १९२९ | ११९.०४ | | |
| १९३० | ११९.६२ | | |
| १९३१ | ११३.४५ | | |

**३. चलिष्णु–माध्य :** न्यासातील प्रवृत्तीचे विवरण न्यासातील उच्चावचनांना चलिष्णु–माध्यद्वारा सरलित केल्यास शक्य आहे. चलिष्णु–माध्य हा सम अथवा विषम पदांचा असू शकतो. तीन पदांचा चलिष्णु माध्य कसा काढावा हे खालील उदाहरणावरून स्पष्ट होईल.

| पद–अर्हा<br>१ | ३–पदांचा चलिष्णुयोग<br>२ | ३–पदांचा चलिष्णु–माध्य<br>३ |
|---|---|---|
| ३ | | |
| ५ | १५ | ५·०० |
| ७ | २२ | ७·३३ |
| १० | २९ | ९·६७ |
| १२ | ३६ | १२·०० |
| १४ | ४१ | १३·६७ |
| १५ | ४६ | १५·३३ |
| १७ | | |

स्तंभ एकमध्ये पद–श्रेणी दिली आहे. स्तंभ २ मधून तीन-तीन पदांचा योग दिला आहे. स्तंभ १ मधील पहिल्या तीन पदांचा योग ( ३+५+७ ) = १५ होतो. हा योग श्रेणीतील दुसऱ्या पदासमोर लिहिला. त्यानंतर श्रेणीतील पहिले पद ( ३ ) हे गाळून, पुढील तीन पदांचा योग ( ५+७+१० ) = २२ हा त्या तीन पदांच्या केन्द्रीय भागासमोर, म्हणजे श्रेणीतील ७ ह्या अंकासमोर लिहा, नंतर ५–वगळून पुढील तीन अंकांचा योग (७+१०+१२), त्या तीन पदांच्या केन्द्रस्थानी लिहा. ह्याप्रमाणे श्रेणीतील राहिलेल्या अंकाकरिताही तीन-तीन पदांचे योग तयार करून वरील पद्धतीप्रमाणें स्तंभ २ पूर्ण करा.

स्तंभ २–मधील योगास तिहीने भागून आलेला माध्य स्तंभ ३–मध्ये ज्याचा तो माध्य आहे त्या योगासमोर लिहावा. अशा तऱ्हेने चलिष्णु–माध्य–श्रेणी पूर्ण करावी.

आर्थिक–कालिक श्रेणीत जी उच्चावचने संभवतात ती बऱ्हंशी व्यापार–उदीमातील चक्रिक गतीमुळे असतात. ही चाक्रिक उच्चावचने सर्वथा अथवा आंशिकरीत्या दूर करणे शक्य आहे. त्याकरिता चलिष्णु माध्याचा उपयोग करतात. हे चलिष्णुमाध्य न्यासान्तर्गत असलेल्या चक्रिक उच्चावचनाइतपत लांबीचे, अथवा त्याच्या भागाबरोबर असावे. अशा तऱ्हेने न्यासातील चक्रिक उच्चावचनांचे सरलन होऊन न्यासांतर्गत प्रवृत्तीचे मापन शक्य होते.

सारणी ११ मधील न्यास उपयोगात आणून चलिष्णु–माध्यद्वारा त्या न्यासातील प्रवृत्ति–अर्हा कशा काढायच्या हे विषम–पदाकारिता सारणी ११ व सम–पदांकारिता सारणी १२ मध्ये दाखविले आहे. सारणी ११ मध्ये सात–पदांचा चलिष्णु–माध्य दिला असून सारणी १२मध्ये सहा पदांचा चलिष्णु माध्य दिला आहे.

## सारणी–११

प्रवृत्ति–दिग्दर्शनार्थ संगणना.

( चलिष्णु–माध्य–विधिद्वारा. )

१९१४ ते १९३२ या कालखंडात अमेरिकेत झालेला सिगारेटचा खप

| वर्ष<br>( १ ) | खप कोटीत<br>( २ ) | चालिष्णु–योग ७–पदांचा<br>( ३ ) | चलिष्णु–माध्य ७–पदांचा<br>( ४ ) |
|---|---|---|---|
| १९१४ | १६·८६ | | |
| १९१५ | १७·९६ | | |
| १९१६ | २५·२९ | | |
| १९१७ | ३५·३३ | २३९·८४ | ३४·२६ |
| १९१८ | ४६·६६ | २७३·८५ | ३९·१२ |
| १९१९ | ५३·१२ | ३०९·४६ | ४४·२१ |
| १९२० | ४४·६२ | ३४८·६२ | ४९·८० |
| १९२१ | ५०·८७ | ३८३·३० | ५४·७६ |
| १९२२ | ५३·५७ | ४१६·६० | ५९·५१ |
| १९२३ | ६४·४५ | ४५२·९३ | ६४·७० |
| १९२४ | ७०·०१ | ५०५·४९ | ७२·२१ |
| १९२५ | ७९·९६ | ५६०·५४ | ८०·०८ |
| १९२६ | ८९·४५ | ६२६·०१ | ८९·४३ |
| १९२७ | ९७·१८ | ६८१·१८ | ९७·३१ |
| १९२८ | १०५·९२ | ७२४·६२ | १०३·५२ |
| १९२९ | ११९·०४ | ७४८·२४ | १०६·८९ |
| १९३० | ११९·६१ | | |
| १९३१ | ११३·४५ | | |
| १९३२ | १०३·५८ | | |

( संयुक्त संस्थानांच्या वाणिज्य–विभागावरून )

वरील सारणीत ७ पदांचा योग व त्यांचाच चलिष्णु–माध्य कसा द्यायचा हे पूर्वी ३–पदांचा योग व ३–पदांचा चलिष्णु माध्य कसा काढायचा ह्याचे जे वर्णन दिले त्याबरहुकूम असावा.

परन्तु समपदांचा योग व माध्य काढताना तो योग व माध्य कोणत्या पदांसमोर केन्द्रित करावा हा प्रश्न पडतो. अशा वेळेस तो योग व माध्य दोन पदांच्या मध्येच केन्द्रित करणे योग्य ठरेल. उदाहरणार्थ : सारणी १२ मध्ये पहिल्या ६ पदांचा योग घेतल्यावर तो १९१६ व १९१७ च्या मध्येच केन्द्रित करावयास हवा. अशा तऱ्हेने संपूर्ण श्रेणीकरिता ६–पदांचा योग घेऊन झाल्यावर त्या योगाचा ६–पदांचा चलिष्णु-माध्य घ्यावा. व मग पुन्हा दोन-दोन पदांचा योग घेऊन त्याचा माध्य केन्द्रित करावा.




आकृती १९ : १९१४ ते १९३२ या कालखंडातील संयुक्त संस्थानातील सिगारेटचा खप : सहा वर्षीय चलिष्णु–माध्यद्वारा प्रवृत्तिदर्शन.

## सारणी–१२

### प्रवृत्ति–दिग्दर्शनार्थ–संगणना.

### ( चलिष्णु–माध्य–विधी )

### सम–वर्षीय कालखंड

१९१४ ते १९३२ ह्या कालखंडात अमेरिकेमध्ये झालेला सिगारेटचा खप

| वर्ष | खप कोटीत | ६ वर्षीय चलिष्णु योग | ६ वर्षीय चलिष्णु माध्य | २ वर्षीय चलिष्णु–योग स्तंभ ४ चा | ६ वर्षीय चलिष्णु-माध्य ( केन्द्रित ) |
|---|---|---|---|---|---|
| ( १ ) | ( २ ) | ( ३ ) | ( ४ ) | ( ५ ) | ( ६ ) |
| १९१४ | १६.८६ | | | | |
| १९१५ | १७.९६ | | | | |
| १९१६ | २५.२९ | १९५.२२ | ३२.५४ | | |
| १९१७ | ३५.३३ | २२२.९८ | ३७.१६ | ६९.७० | ३४.८५ |
| १९१८ | ४६.६६ | २५५.८९ | ४२.६५ | ७९.८१ | ३९.९१ |
| १९१९ | ५३.१२ | २८४.१७ | ४७.३६ | ९०.०१ | ४५.०५ |
| १९२० | ४४.६२ | ३१३.२९ | ५२.२२ | ९९.५८ | ४९.७९ |
| १९२१ | ५०.८७ | ३३६.६४ | ५६.११ | १०८.३३ | ५४.१७ |
| १९२२ | ५३.५७ | ३६३.४८ | ६०.५८ | ११६.६९ | ५८.३५ |
| १९२३ | ६४.४५ | ४०८.३१ | ६८.०५ | १२८.६३ | ६४.३२ |
| १९२४ | ७०.०१ | ४५४.६२ | ७५.७७ | १४३.८२ | ७१.९१ |
| १९२५ | ७९.९६ | ५०६.९७ | ८४.५० | १६०.२७ | ८०.११ |
| १९२६ | ८९.४५ | ५६१.५६ | ९३.५९ | १७८.०९ | ८९.०५ |
| १९२७ | ९७.१८ | ६११.१७ | १०१.८६ | १९५.४५ | ९७.७२ |
| १९२८ | १०५.९२ | ६४४.६६ | १०७.४४ | २०९.३० | १०४.६५ |
| १९२९ | ११९.०४ | ६५८.८९ | १०९.८० | २१७.२४ | १०८.६२ |
| १९३० | ११९.६२ | | | | |
| १९३१ | ११३.४५ | | | | |
| १९३२ | १०३.५८ | | | | |

आकृती १९ मध्ये सारणी १२ तील ६–पदांच्या चलिष्णु–माध्यद्वारा प्राप्त प्रवृत्ति–रेखा दिग्दर्शित केली आहे—

## प्रकरण ६

# कालिक-श्रेणी-विश्लेषण : प्रवृत्ति-दर्शन

### अल्प-तम वर्गरीती सरलरेखीय

कोणत्याही ग्राफमधील प्रांकित रेषेचे सूत्र त्या चित्रांकणाच्या निव्वळ ाहणीवरून तयार करिता येते.

आकृती २० मधील ‘ड’–या रेषेचे सूत्र त्या रेषेने दर्शित ‘थ’ व ‘र’




आकृती २०

च्या अर्हेवरून काढता येईल. ‘ज’ व ‘श’ ह्या रेषांची सूत्रेही वरीलप्रमाणेच प्राप्त होऊ शकतात.

रेषा ‘ज’ : र = २य.

रेषा ‘श’ : र = ३य.

वरील समीकारात 'य'–ची अर्हा एका एककाने वाढली तर 'र' ची अर्हा किती एककाने वाढवावी हे 'य' च्या मापांकावरून स्पष्ट होते. संदर्भार्थ सदर मापांकाकरिता 'ख' हे अक्षर वापरतात. तेव्हा वरील तऱ्हेने समीकार सर्वसाधारण स्वरूपात खालीलप्रमाणे लिहिणे शक्य आहे.

र = ख·य

'ख' ह्या गुणकाची–अर्हा ज्या प्रमाणात वाढते, त्याच प्रमाणात रेषेचा चढही वाढतो. त्यामुळे असे म्हणता येईल की 'ख' ह्या अर्हेने सदर समीकारात रेषेचा उतार दाखविला जातो. रेषेची ही वृत्ति अधोमुख ( अवरोही अथवा खाली उतरणारी ) असेल तर 'ख'–ची अर्हा ऋण असते. म्हणजे 'य' मध्ये एक युनिट वाढ झाली तर त्याच प्रमाणात 'र' खाली घसरतो.




आकृती २१

आकृती २१ मधील 'ट'–रेषेकरिता 'य' व 'र' च्या अर्हा निरनिराळ्या घेतल्यास खालीलप्रमाणे परिणाम संभवतात.

| य... | र... |
|---|---|
| ० | १ |
| १ | २ |
| २ | ३ |
| ३ | ४ |
| ४ | ५ |

'य –मध्ये एक–एककाची वृद्धी झाल्यास 'र' ची अर्हाही एकाच एककाने वृद्धिंगत होते. त्यामुळे 'ख' ची अर्हा एकच समजावी. ह्यावरून लक्ष्यात येईल की 'र'–अर्हा ही सतत 'य'–अर्हेपेक्षा एकाच–एककाने अधिक आहे; व त्यामुळे सदर रेषा प्रवृत्ती खालील समीकारद्वारा दर्शित होते.

र = १ + १य·

त्याचप्रमाणे, 'ठ'–ह्या रेषेकरिता हा समीकार असा:

र = १ + २य·

कारण 'य'–च्या शून्य अर्हेबरोबर 'र' ची अर्हा एक एकक असूनही य–मध्ये जर एक–एककाची वाढ झाली तर 'र'–मध्ये दोन एककाची वृद्धी होते. म्हणजेच य–अर्हा शून्य असताना 'र'–अथवा उदग्र–अक्षावर जेथे ही रेषा काट मारते तितकी ह्या नवीन अचलाची अर्हा असते. 'ट' व 'ठ' ह्या रेषे-करिता हा बिन्दू आकृती २१ मध्ये बाणाने दाखविला आहे.

वरील समीकारातील एक–ह्या नवीन अचलाकरिता 'क'–हे आद्याक्षर वापरतात. मग वरील समीकार आद्याक्षरात खालीलप्रमाणे दर्शित होईल.

र = क + ख·य (१९)

## अल्पतम वर्गरीती :

दिलेल्या न्यासात सरल रेखीय प्रवृत्तीची कल्पना गृहीत धरल्यास खालील समीकाराने न्यासातील ही प्रवृत्ती दर्शित होऊ शकेल.

र = क + ख. य.

अर्थात ह्या समीकारांतील 'क' व 'ख' च्या अर्हा मात्र निश्चित करावयास हव्या.

र = क + ख. य ह्या समीकाराने अनंत अशा सरल–रेषा दर्शित होतात. त्यामुळे दिलेल्या न्यासाकरिता कोणत्या एका विशिष्ट सरल-रेषेचे अन्वायोजन उत्तम आहे हे निश्चित करणे क्रमप्राप्त ठरते. अल्पतम वर्गरीतीने हे सरल रेषा आहे. ह्या

तत्त्वानुसार अनेक रेषांपैकी ती रेषा उत्तम अन्वायुक्त मानण्यात येते की जिच्या विचलनांच्या वर्गांचा योग अल्पतम असतो. विचलनाच्या वर्गांचा योग अल्पतम असू शकणारी रेषा ह्या अनेक रेषांत फक्त एकच असते.

ह्या रेषेस **अल्पतम–वर्गरेषा** असे म्हणतात.

दिलेल्या श्रेणीकरिता अशा तऱ्हेची ही अल्पतम वर्गरेषा प्रसामान्य समीकाराच्या संचातून निवडून काढणे शक्य आहे. हे प्रसामान्य–समीकार गणितीय विधिद्वारा व्युत्पादित होतात; परंतु नेहमीच्या कामकाजास्तव ते खालीलप्रमाणे गुणन–फल विधिद्वारा व्युत्पादित करण्यात येतात.

ही गुणन–फल–रीती अशी : " र = क + ख. य "–ह्या समीकारास 'क' व 'ख' ह्या अज्ञात–राशीच्या गुणकाने गुणावे. 'क' ह्या अज्ञात–राशीचा गुणक एक आहे, व ह्या गुणकाने सदर समीकारास गुणल्यास गुणन–फल र = क + ख. य असेच येते.

न्यासातील सर्व पद–अर्हांच्या बिन्दूकरिता सदर समीकार आकलित केल्यास येणारे आकलन खालीलप्रमाणे होय.

**( १ ) धी ( र ) = धी. क + ख. धी ( य )**

परंतु **धी. क = डा. क** ( २० )

म्हणून वरील समीकार ( १ ) चे रूप असे:—

( १ ) धी ( र ) = डा क + ख. धी ( य ).

'ख' ह्या अज्ञात राशीचा गुणक 'य' आहे. सदर प्रसामान्य समीकारास 'य' ह्या गुणकाने गुणल्यास प्राप्त होणारा परिणाम असा :

$$\text{य. र = क. य + ख. य}^2 \qquad (२१)$$

न्यासातील सर्व पद–अर्हांच्या बिन्दूकरिता वरील समीकार आकलित केल्यास प्राप्त होणारे आकलन येणेप्रमाणे :—

$$\text{( २ ) धी ( रय ) = क. धी ( य ) + ख. धी ( य}^2\text{ )} \qquad (२२)$$

वरील दोन समीकारांच्या साहाय्याने दोन्ही अज्ञात अर्हा काढता येतील. प्रवृत्ति–रेषेचेही अन्वायोजन त्यामुळे सहज शक्य आहे.

## अल्पतम–वर्गरीती प्रयोग :

सारणी १३ मध्ये दिलेल्या न्यासाधारे हा अल्पतम–वर्गरीतीचा प्रयोग सिद्ध करण्यात येत आहे. दिलेल्या न्यासात सरल–रेखीय प्रवृत्ती आहे असे गृहीत धरल्यास

र = क + ख.य

हा समीकार सोडवावयास हवा. त्याकरिता खालील दोन प्रसामान्य समीकारांचे साहाय्य हवे.

( १ ) धी ( र ) = डा. क + ख. धी ( य ) (२३)

( २ ) धी ( यर ) = क. धी (य) + ख. धी ( $य^२$ ) (२४)

वरील समीकार सोडविण्यासाठी खालील अर्हांचे संगणन आवश्यक आहे. धी ( य ), धी ( र ), धी ( य·र ), धी ( $य^२$ ), डा.

अशा कृत्यांतून 'काल' हा नेहमी य–अक्षावर चित्रांकित होतो म्हणून त्यास य–चल असे म्हणतात. उत्पादन नेहमी र–अक्षावर दर्शविले जाते; व म्हणून त्यास र–चल असे म्हणतात.

सारणी १३ तून दिलेला कालखंड १९१६–१९१७ वगैरे संगणनेच्या दृष्टीने क्लिष्ट असल्याने स्तंभ २ मधून दिल्याप्रमाणे त्यास पुन्हा सर्वसाधारण क्रमांक द्यावे. असे करताना त्या कालखंडाचे जे मूळ वर्ष असेल त्यास शून्य हा क्रमांक द्यावा. दोन्ही श्रेणींतील संवादित्व मग ह्या शून्याने सिद्ध होते.

वरील प्रसामान्य–समीकार सोडविण्याकरिता आवश्यक अशा अर्हा सारणी १३ वरून प्राप्त होतात, त्या अशा :

डा = १५

धी ( य ) = १०५, धी ( र ) = २१८६·३

धी ( यर ) = १७३२८·४, धी ( $य^२$ ) = १०१५

ह्या अर्हा वरील प्रसामान्य–समीकारात सामाविष्ट केल्यास येणारे रूपक खालीलप्रमाणे :

( १ ) २१८६·३ = १५ क + १०५ ख.

( २ ) १७३२८·४ = १०५ क + १०१५ ख.

समयामिक विधीने हे समीकार सोडविल्यास येणाऱ्या 'क' व 'ख' च्या अर्हा अशा :

क = ९५·१४

ख = ७·२३

सर्वसाधारण समीकारात ह्या अर्हा प्रविष्ट केल्यास प्रवृत्ति–दिग्दर्शक रेषा जी प्राप्त होते ती अशी : र = ९५·१४ + ७·२३ य

ह्या समीकाराचा अर्थ लावताना कालखंडाचे मूळ व संगणनेत उपयोगात आणलेल्या एककाचा निर्देश अत्यावश्यक होय.

वरील समीकार अंतिम रीत्या असा वाचावा.

"१९१६ ते १९३० ह्या कालखंडातील यू. एस्. ए. मधील अल्युमिनियमच्या वार्षिक उत्पादनातील प्रवृत्ती र = ९५·१४ + ७·२३ य अशी आहे. ह्या कालखंडाचा मूलबिन्दू १९१६ हे वर्ष असून संगणना दशलक्ष पौंडात आहे."

सारणी–१३

प्रवृत्ति–दिग्दर्शनार्थ–संगणना.

अल्पतम–वर्गरीतीप्रमाणे

यू. एस. ए. तील १९१६ ते १९३० कालखंडातील अल्युमिनियमचे वार्षिक उत्पादन.

| वर्ष (१) | य (२) | उत्पादन (दशलक्ष पौंडात) र (३) | यर (४) | य² (५) |
|---|---|---|---|---|
| १९१६ | ० | ११०·२ | ० | ० |
| १९१७ | १ | १४३·३ | १४३·३ | १ |
| १९१८ | २ | १४३·३ | २८६·६ | ४ |
| १९१९ | ३ | १३४·५ | ४०३·५ | ९ |
| १९२० | ४ | १३८·० | ५५२·० | १६ |
| १९२१ | ५ | ५५·० | २७५·० | २५ |
| १९२२ | ६ | ७४·० | ४४४·० | ३६ |
| १९२३ | ७ | १२९·० | ९०३·० | ४९ |
| १९२४ | ८ | १५०·० | १२००·० | ६४ |
| १९२५ | ९ | १४०·० | १२६०·० | ८१ |
| १९२६ | १० | १४५·० | १४५०·० | १०० |
| १९२७ | ११ | १६०·० | १७६०·० | १२१ |
| १९२८ | १२ | २१०·० | २५२०·० | १४४ |
| १९२९ | १३ | २२५·० | २९२५·० | १६९ |
| १९३० | १४ | २२९·० | ३२०६·० | १९६ |
| | १०५ | २१८६·३ | १७३२८·४ | १०१५ |

सारणी १३ तील न्यासाकरिता वरील प्रवृत्ति–रेषा प्रांकित करावयाची असल्यास 'र' च्या क्रमिक अर्हा संगणित करावयास हव्या. १९१८ ह्या वर्षा–

करिता सारणीतील य–ची अर्हा दोन आहे. ही अर्हा आलेल्या प्रवृत्ति–रेषेच्या समीकारात समाविष्ट केल्यास १९१८ करिता येणारी र–अर्हा अशी :

$$र = ९५{\cdot}१४ + ७{\cdot}२३\ (२)$$
$$= ९५{\cdot}१४ + १४{\cdot}४६$$
$$= १०९{\cdot}६०$$

अशा तऱ्हेने इतर वर्षांकरिताही र–च्या अर्हा काढता येतील. कोणतेही दोन बिन्दू सांधल्यास सरळ रेषा येते. म्हणून कोणत्याही दोन वर्षांच्या र–अर्हा प्रांकित करून त्या सांधल्यास यू.एस्.ए. तील १९१६ ते १९३० ह्या कालखंडातील अल्युमिनियम उत्पादनाची प्रवृत्ति–रेषा प्राप्त होईल.

आकृती २२ मध्ये १९१६ ते १९३० ह्या कालखंडातील संयुक्त संस्थानचे अल्युमिनियमचे वार्षिक उत्पादन आणि अल्पतमवर्ग रीतीप्रमाणे प्राप्त सरल–रेखीय प्रवृत्ति–रेषा देण्यात आली आहे.




आकृती २२ : १९१६ ते १९३८ कालखंडांतील अल्युमिनियमचे वार्षिक उत्पादनः–अल्पतमवर्ग रीतीद्वारा प्राप्त प्रवृत्ति–रेषेसह.

### प्रवृत्ति-रेषा संगणनार्थ लघु-रीती:

प्रवृत्ति-संगणनेत विषम-वर्षांचा उपयोग केल्यास सारणी १३ मधील गणना अधिक सुगम होऊ शकते. दिलेल्या कालखंडातील मधले वर्ष मध्यका मानून त्यास शून्य ही य-अर्हा द्यावी. त्यापूर्वीच्या वर्षांना ऋण व त्यानंतरच्या वर्षांना अधिक समजून वरीलप्रमाणे गणना पूर्ण करावी. सारणी १३ मधील न्यासाकरिता लघु-रीतीने संगणना कशी पूर्ण करावयाची हे सारणी १४ मध्ये दाखविले आहे. ह्या रीतीप्रमाणे धी ( य ) ची योग-अर्हा शून्य असते. हे सारणी १४ स्तंभ २ वरून कळून येईल. अर्थात मग अल्पतमवर्ग रीतीतले दोन्ही प्रसामान्य-समीकाराचे रूप खालीलप्रमाणे उरते.

( १ ) धी ( र ) = डा·क  ( २५ )

( २ ) धी ( रय ) = ख·धी ( $य^2$ )  ( २६ )

## सारणी-१४

प्रवृत्ति-दिग्दर्शनार्थ संगणना.

अल्पतमवर्ग रीतीप्रमाणे: विषम-वर्षीय लघु-रीतीने.

१९१६ ते १९३० दरम्यान युनायटेड-स्टेट्समधून उत्पादित अल्युमिनियम.

| वर्ष ( १ ) | य ( २ ) | र ( ३ ) | यर ( ४ ) | $य^2$ ( ५ ) |
|---|---|---|---|---|
| १९१६ | −७ | ११०·२ | −७७१·४ | ४९ |
| १९१७ | −६ | १४३·३ | −८५९·८ | ३६ |
| १९१८ | −५ | १४३·३ | −७१६·५ | २५ |
| १९१९ | −४ | १३४·५ | −५३८·० | १६ |
| १९२० | −३ | १३८·० | −४१४·० | ९ |
| १९२१ | −२ | ५५·० | −११०·० | ४ |
| १९२२ | −१ | ७४·० | − ७४·० | १ |
| १९२३ | ० | १२९·० | ० | ० |
| १९२४ | +१ | १५०·० | १५०·० | १ |
| १९२५ | +२ | १४०·० | २८०·० | ४ |
| १९२६ | +३ | १४५·० | ४३५·० | ९ |
| १९२७ | +४ | १६०·० | ६४०·० | १६ |
| १९२८ | +५ | २१०·० | १०५०·० | २५ |
| १९२९ | +६ | २२५·० | १३५०·० | ३६ |
| १९३० | +७ | २२९·० | १६०३·० | ४९ |
|  | ० | २१८६·३ | २०२४·३ | २८० |

आलेल्या अर्हा प्रसामान्य–समीकारांतून समाविष्ट केल्यास,

( १ ) २११८६·३ = १५ क

( २ ) २०२४·३ = २८० ख

हे रूप येते. म्हणजे क = १४५·७५

व ख = ७·२३ अशा अर्हा येतात.

प्रवृत्ति–दिग्दर्शनार्थ प्राप्त समीकार यामुळे असा :

" १९१६ ते १९३० या कालखंडातील युनायटेड–स्टेट्स मधील अल्युमिनियमच्या वार्षिक उत्पादनातील प्रवृत्ती र = १४५·५६+७·२३ य अशी आहे. ह्या कालखंडाचा मूल–बिन्दू १९२३ हे वर्ष असून संगणना दशलक्ष पौंडातील होय. "

एकाच तऱ्हेच्या न्यासाकरिता वर दिलेल्या संगणना रीतीप्रमाणे दोन निरनिराळ्या प्रवृत्ति–रेषा प्राप्त होतात. अर्थात हे सर्वच चूक आहे, असा प्रथम–दर्शनी ग्रह होण्याचा संभव आहे. खरे पाहिले असता दोन्ही रेषा एकच आहेत. पहिल्या रीतीत १९१६ हा मूलबिन्दू आहे, तर दुसऱ्या रीतीत १९२३ हा मूलबिन्दू आहे. पहिल्या रीतीच्या अनुषंगाने १९२३ हे वर्ष ७ व्या क्रमांकावर येते. तेव्हा य–करिता ७ ही अर्हा पहिल्या प्रवृत्ति–रेषेत ऐवजी धरल्यास र = १४५·७५ येतात.

र = ९५·१४ + ७·२३ × ७

= १४५·७५

म्हणजेच दोन्ही प्रवृत्ति–रेषा संपूर्णपणे संवादी होत.

# कालिक–श्रेणी–विश्लेषण : अ–रेखीय प्रवृत्ती

न्यासातील आरोही–वृत्तीचा अर्ध जेव्हा सारखा बदलत असतो, तेव्हा त्या न्यासातील प्रवृत्ती सरल–रेषेने दर्शित होत नाही. एकेन्द्र, अधीन्द्र वगैरेसारख्या अरेखीय वक्राने अशी प्रवृत्ती अधिक सयुक्तिकपणे दिग्दर्शित होते. कोणत्याही न्यासातील अशा प्रकारच्या अरेखीय प्रवृत्तीचे दर्शन सर्वांत सोपे व सुगम असे एकेन्द्र वक्रद्वारे होते. हे एकेन्द्र खालील सर्वसाधारण सूत्राने दर्शित होते—

$$र = क + ख. य + ग. य^2 \qquad (२७)$$

ह्या वक्राचे अन्वायोजनही मागच्या प्रकरणात वर्णन केलेल्या रीतीने होते. फरक फक्त अज्ञात अचलांच्या संख्येत आहे. वरील समीकारात तीन अज्ञात अचल आहेत. म्हणून तीन प्रसामान्य समीकारांची आवश्यकता आहे.

वरील सामान्य समीकारांस, आधीच्या प्रकरणात वर्णन केल्याप्रमाणे दरवेळेस एकाच अज्ञात अचलाने गुणल्यास येणारे तीन प्रसामान्य समीकार असे :—

$$(१)\ धी(र) = डा. क + ख. धी(य) + ग. धी(य^2) \qquad (२८)$$

$$(२)\ धी(यर) = क. धी(य) + ख. धी(य^2) + ग. धी(य^3) \qquad (२९)$$

$$(३)\ धी(य^2. र) = क. धी(य^2) + ख. धी(य^3) + ग. धी(य^4) \qquad (३०)$$

हे समीकार सोडविण्याकरिता खालील अर्हांची दिलेल्या न्यासावरून संगणना करावयास हवी.

धी (य), धी (र), धी (य. र) धी ($य^2$)
धी ($र^2$) धी ($य^2$. र) व डा. आणि
धी ($य^3$), व धी ($य^4$).

संगणित अशा ह्या अर्हा मग वरील तीन्ही समीकारात समाविष्ट करून समयामिक रीतीने हे समीकार सोडविल्यास क, ख व ग ह्या अज्ञात–अचलांच्या अर्हा प्राप्त होतात.

व्यवहारात ही रीती कशी उपयोगात आणावयाची हे सारणी १५ वरून लक्षात येईल.

## सारणी–१५.

### प्रवृत्ति–दिग्दर्शनार्थ संगणना.

### अल्पतम वर्गरीती : द्वि–मात्रा–घात वक्र ( एकेन्द्र )

१९१५ ते १९३० दरम्यान अमेरिकेतून झालेली गॅसोलीनची निर्यात.

| वर्ष (१) | य (२) | निर्यात ( दशलक्ष र–पिंपात) (३) | यर (४) | य² (५) | य². र (६) | य³ (७) | य⁴ (८) |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १९१५ | ० | २·७ | ० | ० | ० | ० | ० |
| १९१६ | १ | ८·५ | ८·५ | १ | ८·५ | १ | १ |
| १९१७ | २ | ९·९ | १९·८ | ४ | ३९·६ | ८ | १६ |
| १९१८ | ३ | १३·३ | ३३·९ | ९ | ११९·७ | २७ | ८१ |
| १९१९ | ४ | ८·९ | ३५·६ | १६ | १४२·४ | ६४ | २५६ |
| १९२० | ५ | १५·३ | ७६·५ | २५ | ३८२·५ | १२५ | ६२५ |
| १९२१ | ६ | १२·७ | ७६·२ | ३६ | ४५७·२ | २१६ | १२९५ |
| १९२२ | ७ | १३·८ | ९६·६ | ४९ | ६७६·२ | ३४३ | २४०१ |
| १९२३ | ८ | २०·१ | १६०·८ | ६४ | १२८६.४ | ५१२ | ४०९६ |
| १९२४ | ९ | २८·३ | २५४·७ | ८१ | २२९२·३ | ७२९ | ६५६१ |
| १९२५ | १० | ३०·६ | ३०६·० | १०० | ३०६०·० | १००० | १०००० |
| १९२६ | ११ | ४२.५ | ४६७·५ | १२१ | ५१४२·५ | १३३१ | १४६४१ |
| १९२७ | १२ | ४४·३ | ५३१·६ | १४४ | ६३७९·२ | १७२८ | २०७३६ |
| १९२८ | १३ | ५२·९ | ६८७·७ | १६९ | ८९४०·१ | २१९७ | २८५६१ |
| १९२९ | १४ | ६२·१ | ८६९·४ | १९६ | १२१७१·६ | २७४४ | ३८४१६ |
| १९३० | १५ | ६५·६ | ९८४·० | २२५ | १४७६०·० | ३३७५ | ५०६२५ |
| | १२०, | ४३१·५ | ४६१४·८, | १२४०, | ५५८५८·२, | १४४००, | १७८३१२ |

( संयुक्त संस्थानचा खाणी विभाग. )

वरील सारणीद्वारा प्राप्त–अर्हा प्रथम, द्वितीय व तृतीय प्रसामान्य–समीकारात समाविष्ट केल्यास जो निष्कर्ष येतो तो असा—

( १ ) ४३१·५ = १६क + १२०ख + १२४०ग.

( २ ) ४६१४·८ = १२०क + १२४० ख + १४४००ग

( ३ ) ५५८५८·२ = १२४०क + १४४००ख + १७८३१२ग.

क, ख व ग ह्या अज्ञात–अचलांच्या अर्हा मिळविण्यासाठी समयामिक समीकार रीतीने ( १ ) व ( २ ) नंतर ( ३ ) व ( १ ) हे समीकार सोडवून ती सरतेशेवटी ह्या द्वंद्वामुळे प्राप्त समीकार सोडविल्यास ‘ ग ’ ची अर्हा प्राप्त होते. जसें—

( २ ) ४६१४·८ = १२० क + १२४० ख + १४४०० ग
( १ ) ३२३६·३० = १२० क + ९०० ख + ९३०० ग (७·५ ने गुणून)

१३७८·५ = ३४० ख + ५१०० ग ( ४ )

( ३ ) ५५८६८·२ = १२४० क + १४४०० ख + १७८३१२ ग
( १ ) ३३४४१·३ = १२४० क + ९३०० ख + ९६१०० ग (७७·५ ने गुणून)

२२४१६·९ = ५१०० ख + ८२२१२ ग ( ५ )

( ५ ) २२४१६·९ = ५१०० ख + ८२२१२ ग
( ४ ) २०६७८·३ = ५१०० ख + ७६५०० ग ( १५ ने गुणून )

१७३८·७ = ५७१२ ग

∴ ग = ०·३०४४

आलेली ही ‘ ग ’ ची अर्हा समीकार ( ४ ) मध्ये समाविष्ट केल्यास :

१३७८·५ = ३४० ख + ५१०० × ०·३०४४
= ३४० ख + १५५२·४४

∴ ख = – ०·५११४

सरतेशेवटी, ख व ग च्या अर्हा ( १ ) समीकारात ठेवून ‘ क ’–ची अर्हा येईल : ४६१४·८ = १२० क + १२४० ( –०·५११४ )
+ १४४०० ( ०·३०४४ )

८६५·५७६ = १२० क.

∴ क = ७·२१३१.

त्यामुळे अंतिम प्रवृत्ति–समीकार असा :

“ १९१५ ते १९३० कालखंडाकरिता अमेरिकेत होणाऱ्या गॅसोलीनची निर्यात प्रवृत्ती......

र = ७·२१३१ – ०·५११४ य + ०·३०४४ य$^2$ अशी आहे. मूळ वर्ष १९१५ व संगणना दश–लक्ष पिंपात आहे. ”

वरील प्रवृत्ति–समीकारावरून १९१५ ते १९३० या कालखंडातील प्रत्येक वर्षाकरिता गॅसोलीन निर्यातीची प्रवृत्ति–अर्हा किती होती हे काढावे. व मग प्रवृत्ति

अर्हा व सत्य–अर्हांचे संवादित्व तपासून पहावे. उदाहरणार्थ : १९२५ हे वर्ष त्या कालखंडातील दहावे वर्ष होय. म्हणजे य = १० असे मानल्यास, १९२५ करिता निर्यातीची प्रवृत्ति–अर्हा येते ती अशी :

$$र = ७·२१३१ + ( - ·५११४ \times १० ) + ·३०४४ \times १०^{२}$$
$$= ३२·५३९१ \text{ दशलक्ष पिंप.}$$

प्रत्यक्षात ३०·६ दशलक्ष पिंप एवढेच गॅसोलीन १९२५ साली निर्यात झाले !

## सारणी–१६

१९१५ ते १९३० दरम्यान अमेरिकेतून निर्यात होणारे गॅसोलीन
( अवलोकन–अर्हा, प्रवृत्ती–अर्हा व प्रवृत्तीचे–विचलन. )

| वर्ष<br>१ | निर्यात<br>२ | प्रवृत्ति–अर्हा<br>३ | विचलन<br>४ |
|---|---|---|---|
| १९१५ | २·७ | ७·२१३१ | −४·५ |
| १९१६ | ८·१ | ७·००६१ | +१·५ |
| १९१७ | ९·९ | ७·४०७९ | +२·५ |
| १९१८ | १३·३ | ८·४१८५ | +४·९ |
| १९१९ | ८·९ | १०·०३७९ | −१·१ |
| १९२० | १५·३ | १२·२६६१ | +३·० |
| १९२१ | १२·७ | १५·१०३१ | −२·४ |
| १९२२ | १३·८ | १८·५४८९ | −४·७ |
| १९२३ | २०·१ | २२·६०३५ | −२·५ |
| १९२४ | २८·३ | २७·२६०९ | +१·० |
| १९२५ | ३०·६ | ३२·५३९१ | −१·९ |
| १९२६ | ४२·५ | ३८·४२०१ | +४·१ |
| १९२७ | ४४·३ | ४४·९०९९ | −०·६ |
| १९२८ | ५२·९ | ५२·००८५ | +०·९ |
| १९२९ | ६२·१ | ५९·७१५९ | +२·४ |
| १९३० | ६५·६ | ६८·०३२१ | −२·४ |
| | | | +०·२ |

म्हणजे : विचलनांचा योग शून्य आहे...अर्थात् प्रवृत्ति–दिग्दर्शक समीकार संपूर्णपणे मूळ न्यासाशी संवादी समजावा.

पूर्वीच्या प्रकरणातून वर्णन केल्याप्रमाणे वर उद्धृत केलेली रीती ' विषम–वर्षे ' हे माप वापरून एकेन्द्राकरिताही अधिक सुगम करता येईल. असे केल्यास धि ( य ) व धि ( य³ ) ह्या अर्हा शून्य होतात. त्यामुळे वरील तिन्ही प्रसामान्य समीकारांचे खालीलप्रमाणे रूपांतर होते.

$$(१)\ \text{धी}(\text{र}) = \text{डा}.\,\text{क} + \text{ग}\cdot\text{धी}(\text{य}^{2}) \qquad (३१)$$

$$(२)\ \text{धी}(\text{य}.\text{र}) = \text{ख}.\,\text{धी}(\text{य}^{2}) \qquad (३२)$$

$$(३)\ \text{धी}(\text{य}^{2}.\text{र}) = \text{क}\cdot\text{धी}(\text{य}^{2}) + \text{ग}.\,\text{धी}(\text{य}^{4}) \qquad (३३)$$

सदर समीकारातून क व ग च्या अर्हा ( १ ) व ( ३ ) वरून येतात; तर ख–ची अर्हा एकदमच ( २ ) वरून प्राप्त होते.

अरेखीय प्रवृत्तीकारिता द्वि–मात्रा–घात वक्रापेक्षाही अधिक उत्तम अन्वायुक्त वक्र दोन मात्रांपेक्षा अधिक मात्रांचे एकेन्द्र असू शकते. परंतु अशा तऱ्हेने साधणारे अन्वायोजन एखादवेळेस प्रवृत्ति–दर्शनापेक्षा चक्रिक अथवा आर्त्तव उच्चावचन असण्याचाच संभव जास्त ! अर्थात् जितके अधिक मात्रांचे वक्र असेल तितकेच अरेखीय प्रवृत्तीच्या बाबतीत अन्वायोजनही अधिक उत्तम असेल ! नेहमीच्या काम-काजात मात्र अधिक मात्रा असलेल्या वक्रांची उपयुक्तता विशेष नसते.

दोनांपेक्षा अधिक मात्रा असणाऱ्या **एकेन्द्राचे** सर्वसाधारण सूत्र असे :—

$$\text{र} = \text{क} + \text{ख}.\,\text{य} + \text{ग}.\,\text{य}^{2} + \text{घ}.\,\text{य}^{3} + \ldots\ldots + \text{ड}.\,\frac{\text{ड}}{\text{य}} \qquad (३४$$

**घातांक श्रेणी :**

कित्येक वेळेस काही श्रेणी अशा असतात की त्यांना सरल–रेषा अथवा **एकेन्द्राचे** अन्वायोजन लागू होत नाही. काही काही श्रेणी अशा असतात की त्यातील प्रवृत्ती गुणोत्तर–श्रेढीने वाढतात. अशा प्रवृत्तींचे दिग्दर्शनार्थ ज्या वक्राचा उपयोग होतो त्याचे सूत्र असे :

$$\text{र} = \text{क}.\,\text{ख}^{\text{य}}$$

अशा तऱ्हेच्या वक्रांतून य–च्या अर्हा साध्या गणितीय श्रेढी प्रमाणात असतात. तर ' र ' च्या अर्हा गुणोत्तर श्रेढी प्रमाणात असतात. अर्ध–छेदा कागदावर त्या प्रांकित केल्या तर येणारी प्रवृत्ति–रेषा ही सरल–रेखीय असते; आणि वक्रास ' अर्ध–छेदा वक्र ' असे म्हणतात.

' य ' व ' र ' अर्हा दोन्ही गुणोत्तर–श्रेढी प्रमाणात असतील, तर येणारे वक्र हे......

$$र = क. य^{ख} \quad (३५)$$

असे असते; व छेदा–कागदावर ह्या न्यासाचे प्रांकण केल्यास येणारे वक्रही सरल–रेखीयच असते.

नेहमीच्या संगणनेसाठी व रोजच्या कामकाजात वरील प्रकारच्या वक्रांचे अन्वायोजन बहुधा छेदात रूपांतरित केल्याने त्वरित होते.

$र = क. ख^{य}$ हे सूत्र छेदात रूपांतरित केल्यास छे. र = छे.क + य. छेख असे होते. पूर्वी वर्णन केल्याप्रमाणे ह्यापासून प्रसामान्यसमीकार काढावे; व 'क' आणि 'ख' च्या अर्हा मिळवाव्या.

ह्याशिवाय दुसरे अनेक विशिष्ट प्रकारचे असे वक्र प्रवृत्ति–दिग्दर्शनार्थ उपयोगात आहेत. परन्तु त्यांच्या अन्वायोजन रीतीही विशिष्ट प्रकारच्या असल्याने त्या सर्वांचा परामर्श घेणे येथे शक्य नाही. अशा विशिष्ट वक्रांपैकी एक वक्र असे:

$$\left. र = क. ख.^{ग^{य}} \right\} \quad (३६)$$

ह्या सूत्राने दर्शविल्या जाणाऱ्या वक्रास गोमपर्टझ् वक्र असे म्हणतात.

## प्रकरण ८

# कालिक-श्रेणी-विश्लेषण

## आर्त्तव व चाक्रिक विश्लेषण

कालिक श्रेणीस ऐतिहासिक श्रेणी असेही म्हणतात. अशा प्रकारच्या श्रेणीतील वार्षिक न्यास तपासून पाहिल्यास त्यात नियामित अशी एक गती आढळून येते. ही गती त्या श्रेणीतील न्यासातून लागोपाठ वर्षानुवर्षे थोड्याफार फरकाने तशीच चालू असते. ऐतिहासिक श्रेणीतील ह्या गतीस आर्त्तवविचरण असे म्हणतात.

अशा श्रेणीच्या वार्षिक न्यासातील प्रत्येक महिना हा इतर महिन्यांच्या मानाने एका विशिष्ट स्थानी असतो. आर्त्तवविचरणाच्या निश्चितीत वार्षिक न्यासातील प्रत्येक महिन्याच्या ह्या विशिष्ट स्थानमाहात्म्याची निश्चिती हाच मुख्य प्रश्न असतो.

### आर्त्तव-विचरण मापांकाच्या रीती

कालिक-श्रेणीतील आर्त्तव-विचरण मापांकाच्या नेहमीच्या प्रचारातील रीती अशा :

(१) सरल-माध्य रीती.

(२) सापेक्ष-बंध रीती.

(३) निष्पत्ति-ते-चालिष्णु माध्य रीती.

(४) निष्पत्ति-ते-प्रवृत्ति रीती.

### सरल-माध्य रीती

(१) न्यासातील सर्व वर्षांच्या मासिक अर्हांचा योग घेऊन त्यांचा समान्तर-मध्यक काढा.

(२) प्रवृत्तीकरिता समायोजन द्या. वरील (१ मधील) मासिक माध्य हा न्यासातील सुदीर्घकालीन प्रवृत्तीमुळे विरूपित झालेला असतो. आरोही प्रवृत्तीत डिसेंबरचा माध्य हा वास्तविकापेक्षा अधिक असतो; कारण वार्षिक प्रवृत्ति-रेषेत डिसेंबरचे स्थान इतर महिन्यांच्या मानाने शेवटचे असते.

त्यानंतर प्रवृत्तीकरिता मासिक-वर्धन निश्चित करावे. त्याकरिता (१) प्रसामान्य मासिक-अंकाकरिता अल्पतम वर्गरेषेचे अन्वायोजन काढा. (२) त्याच्या

'ख' अर्हेस १२ ने भागा. आलेली अर्हा ही प्रत्येक महिन्याचा मासिक-माध्य त्याच्या पूर्वीच्या महिन्याच्या मासिक माध्यापेक्षा कितीने विरूपित आहे हे सूचित करते.

उदाहरणार्थ —फेब्रुवारीचा माध्य जानेवारीच्या पातळीत आणण्याकरिता फेब्रुवारीच्या माध्यातून सर्वसाधारण मासिक वर्धनांक उणे करावयास हवा. मार्चचा माध्य जानेवारीच्या पातळीत आणण्याकरिता मार्चच्या माध्यातून सर्वसाधारण मासिक वर्धनाच्या दुप्पट अर्हा उणे करावी. एप्रिलकरिता तिप्पट अर्हा उणे करावी ....... वगैरे. अशा तऱ्हेने हे समायोजन पूर्ण करावे.

( ३ ) आलेला शोधित माध्य हा एकूण कालखंडाच्या माध्यांचा किती प्रतिशत आहे हे काढावे. आलेल्या ह्या अर्हांना आर्त्तवविचरण-देशनांक असे म्हणतात. जानेवारीकरिता आलेली ९३ प्रतिशत अर्हा ही वार्षिक माध्यापेक्षा ७ प्रतिशत कमी आहे असे मानावे.

## सापेक्ष-बंध-रीती

ह्या रीतीत सर्वप्रथम प्रत्येक मासिक अर्हा ही त्याच्या पूर्वीच्या मासिक अर्हेच्या किती प्रतिशत आहे हे ठरवावे. अशा तऱ्हेने प्राप्त होणाऱ्या अंकांना सापेक्ष-बंध असे म्हणतात.

## सारणी–१७

### १९१९ ते १९३३ दरम्यानचे साप्ताहिक भरताडाचे अंक
( १००० च्या एककात )

| ास : | १९१९ | १९२० | १९२१ | १९२२ | १९२३ | १९२४ | १९२५ | १९ |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ानेवारी | ७२८ | ८२० | ७०५ | ७०२ | ८४५ | ८५८ | ९२१ | ९ |
| ब्रुवारी | ६८७ | ७७६ | ६८३ | ७६५ | ८४२ | ९०८ | ९०५ | ९ |
| ार्च | ६९७ | ८४८ | ६९२ | ८२६ | ९१७ | ९१६ | ९२४ | ९ |
| प्रिल | ७१५ | ७३१ | ७०६ | ७२३ | ९४१ | ८७५ | ९४१ | ९ |
| | ७५९ | ८६२ | ७५७ | ७८७ | ९७५ | ८९५ | ९६८ | १० |
| न | ८०९ | ८६० | ७६५ | ८४२ | १०११ | ९०६ | ९८९ | १० |
| लै | ८५८ | ९०१ | ७५१ | ८९५ | ९८६ | ८९४ | ९८६ | १० |
| ॉगस्ट | ८९२ | ९६८ | ८१० | ८७७ | १०४१ | ९७४ | १०८० | ११ |
| टेंबर | ९६० | ९६९ | ८४१ | ९३५ | १०३७ | १०३७ | १०७४ | ११ |
| ॉक्टोबर | ९६७ | १००५ | ९२९ | ९९२ | १०७८ | १०९१ | ११०७ | १२ |
| व्हेंबर | ८०७ | ८८४ | ७६१ | ९४४ | ९७८ | ९७५ | १०२४ | १० |
| सेंबर | ७५८ | ७२३ | ६८३ | ८३८ | ८२६ | ८४७ | ८८८ | ९ |
| ध्य : | ८०३·८ | ८६२·२ | ७५६·९ | ८३८·० | ९५६·४ | ९३१·३ | ९८३·० | १०२ |

| मास: | १९२९ | १९३० | १९३१ | १९३२ | १९३३ | |
|---|---|---|---|---|---|---|
| जानेवारी | ८९३ | ८३७ | ७१९ | ५६७ | ४७८ | = |
| फेब्रुवारी | ९४२ | ८७६ | ७०९ | ५६१ | ४८९ | = |
| मार्च | ९६२ | ८८३ | ७३५ | ५६५ | ४६७ | = |
| एप्रिल | ९९६ | ९१२ | ७५२ | ५७५ | ५०३ | = |
| मे | १०५१ | ९१४ | ७४० | ५२२ | ५२७ | = |
| जून | १०५२ | ९३० | ७४८ | ४९१ | ५९८ | = |
| जुलै | १०३८ | ८९५ | ७३८ | ४८३ | ६१७ | = |
| ऑगस्ट | १११७ | ९३८ | ७४७ | ५२५ | ६३४ | = |
| सप्टेंबर | ११३५ | ९३१ | ७३७ | ५७७ | ६३४ | = |
| ऑक्टोबर | ११६९ | ९५० | ७५९ | ६३४ | ६५१ | = |
| नोव्हेंबर | ९७८ | ७९८ | ६५५ | ५४९ | ५७२ | = |
| डिसेंबर | ८३५ | ६८० | ५५५ | ४८५ | ५१८ | = |
| माध्य | १०१४·० | ८७८·७ | ७१६·२ | ५४३·० | ५५७·३ | |

## सारणी–१८

आर्त्तव–विचरण–देशनांक–संगणना.

सरल–माध्य–रीती

१९१९ ते १९३३ दरम्यानची साप्ताहिक भरताड.

| (१) मास | (२) मासिक-माध्य | (३) प्रवृत्तीकरिता शोधन | (४) शोधित माध्य | (५) आर्त्तव देशनांक |
|---|---|---|---|---|
| जानेवारी | ७८६·९ | — | ७८६·९३ | ०·९३ |
| फेब्रुवारी | ७९४·३ | – २·०५ | ७९२·२५ | ०·९४ |
| मार्च | ८२३·६ | – ४·०९ | ८१९·५१ | ०·९७ |
| एप्रिल | ८१४·७ | – ६·१४ | ८०८·५६ | ०·९६ |
| मे | ८५४·७ | – ८·१८ | ८४६·५२ | १·०० |
| जून | ७६७·५ | –१०·२३ | ८५७·२७ | १·०१ |
| जुलै | ८६५·७ | –१२·२७ | ८५३·४३ | १·०१ |
| ऑगस्ट | ९२१·८ | –१४·३२ | ९०७·४८ | १·०७ |
| सप्टेंबर | ९४८·६ | –१६·३६ | ९३२·२४ | १·१० |
| ऑक्टोबर | ९८८·५ | –१८·४१ | ९७०·०९ | १·१५ |
| नोव्हेंबर | ८६७·३ | –२०·४५ | ८४६·८५ | १·०० |
| डिसेंबर | ७५०·५ | –२२·५० | ७२८·०० | ०·८६ |
| | | | १०,१४९·१३ | |
| | | ∴ माध्य = | ८४५·७६ | |

सारणी १९ मध्ये दिलेले अंक हे निरपेक्ष अंक नसून प्रतिशततेत सापेक्ष-बंध म्हणून दिले आहेत.

अशा तऱ्हेने आलेल्या प्रत्येक महिन्याच्या सापेक्ष–बंध–अंकाचा माध्य काढावा. त्यामुळे कोणत्याही महिन्याचा त्याच्या पूर्वीच्या महिन्याशी काय संबंध आहे हे कळते. उदाहरणार्थ : सारणी १९ वरून कळून येईल की, जून महिन्याची दशा ही मेच्या मानाने १०१·६ प्रतिशत आहे.

सापेक्ष-बंध रीतीत समान्तर-मध्यकेऐवजी मध्यगाचा सापेक्ष-बंध म्हणून उपयोग प्रस्तुत होय; कारण असाधारण अशा चरम मासिक अर्हांमुळे समान्तर-मध्यक हे बरेचसे विरूपित होते.

मध्यगारूपी सापेक्ष-बंध हे फक्त त्या महिन्याचा पूर्वीच्या महिन्याशी काय संबंध आहे एवढेच दाखवितात. इतर महिन्यांशी त्यांचा काय संबंध आहे ह्याचा त्यावरून अंदाज घेता येत नाही. त्याकरिता प्राथमिक असे हे सापेक्ष-बंध-अंक साखळी-सापेक्षात रूपांतरित करणे श्रेयस्कर ठरते. जानेवारी ह्या पहिल्या महिन्याची अर्हा अशा वेळेस स्वेच्छया १०० मानून इतर महिन्यांचे सापेक्ष-बंध-अंक त्या प्रमाणात रूपांतरित करून घ्यावे. थोडक्यात ही संगणना अशी : कोणत्याही महिन्याच्या सापेक्ष-बंध-अंकास त्याच्या पूर्वीच्या महिन्याच्या साखळी-सापेक्षाने गुणून शंभराने भागावे. ह्याप्रमाणे बाराही महिन्यांचे साखळी-सापेक्ष-समंक प्राप्त झाल्यावर सरतेशेवटी आणखी एका पुढील वर्षीच्या जानेवारीकरिता हा समंक काढावा. त्यामुळे वार्षिक चक्रातील त्याच महिन्याची पुढची प्रगत-अर्हा काय असू शकेल हे कळते.

अशा तऱ्हेने आलेल्या जानेवारीच्या साखळी-सापेक्षात नेहमीच अन्तर आढळून येते. हे अन्तर न्यासातील प्रवृत्ति-वर्धनामुळे उद्भवते.

सारणी २० मध्ये हे प्रवृत्ति-वर्धन १८·९ इतके आहे. ह्या वर्धनाकरिताही साखळी-सापेक्षाचे समायोजन व्हावयास हवे. सदर समायोजन १२ महिन्यांच्या कालखंडावर पसरलेले असल्याने प्रत्येक महिन्याच्या साखळी-सापेक्ष अंकातून (स्तंभ २, सारणी २०) वरील अन्तराच्या $\frac{१}{१२}$ अर्हा अथवा त्याची पट एवढी वजा करावयास हवी. जानेवारीकरिता हा साखळी-सापेक्ष-अंक १०० आहे.

फेब्रुवारीकरिता तो $\left(\frac{८७·५-१८·९}{१२}\right)$ = ८५·९ होईल. मार्चकरिता हाच

शोधित – साखळी – सापेक्ष [ ८९·८ – १८·९ × २ । १२ ] = ८६·६

असा येईल .... एप्रिलकरिता $\left(८७·३ - \frac{१८·९\times३}{१२}\right)$ = ८३·६

असेल .... वगैरे ...

अशा तऱ्हेने ह्या सर्व बाराही महिन्यांच्या साखळी-सापेक्ष अर्हा मग एकाच पातळीवर येतात. प्राप्त समंकास **शोधित-साखळी सापेक्ष-अंक** असे म्हणतात. सारणी २०, स्तंभ ३ मध्ये १९१४ ते १९२९ ह्या कालखंडात संयुक्त संस्थानातील कोळसा उत्पादनाकरिता आलेले हे शोधित-अंक दिले आहेत.

निष्पत्ती-ते-चालिष्णुमाध्य रीतीः—

( १ ) न्यासातील आर्त्तव विचरणे प्रथमतः बारमाही चलिष्णु माध्याद्वारे सरालित करावी. न्यासातील वास्तविक अर्हा व आलेली चलिष्णु-माध्य अर्हा ह्यातील अन्तर हे न्यासातील आर्त्तवामुळे संभवते.

( २ ) न्यासातील प्रत्येक अर्हेची संवादी अशा त्याच्या चलिष्णु–माध्य अर्हेशी असणारी निष्पत्ती निश्चित करा.

( ३ ) न्यासातील एकूण वर्षांच्या प्रत्येक महिन्याकरिता ह्या निष्पत्तीचा माध्य घ्या. हा माध्य काढण्याकरिता समान्तर-मध्यक अथवा मध्यगा उपयोगात आणू शकता.

( ४ ) प्राप्त होणारा माध्य हा न्यासातील आर्त्तव–विचरणाचा देशनांक होय.

निष्पत्ती–ते–प्रवृत्ती रीतीः—

ह्या रीतीने न्यासातील आर्तव–विचरणांचे मापन होते. त्याशिवाय न्यासातील चक्रिक व समसंभावी विचरणांचेही मापन होते.

( १ ) न्यासातील प्रत्येक महिन्याची वास्तविक–अर्हा ही प्रथमतः संवादी अशा प्रवृत्ति-अर्हेच्या प्रतिशततेत रूपांतरित करून घ्यावी. त्याकरिता अल्पतम वर्ग-रीतीचा उपयोग करावा.

## सारणी–१९

सापेक्ष-बंध रीती १९१४ ते १९२९ दरम्यान संयुक्त-संस्थानांत झालेले कोळशा

| महिना | १९१४ | १९१५ | १९१६ | १९१७ | १९१८ | १९१९ |
|---|---|---|---|---|---|---|
| जानेवारी | --- | ९९.२९ | १०१.७० | १०८.७८ | ९५.८९ | १०५.८० |
| फेब्रुवारी | ८८.२६ | ७८.०० | ९७.०० | ८६.२० | १०३.६७ | ७६.०८ |
| मार्च | १२८.१६ | १०८.४६ | ९६.९९ | ११५.७७ | १०९.८९ | १०६.८२ |
| एप्रिल | ५१.९४ | ९४.२५ | ७६.७३ | ८७.४२ | ९५.७० | ९५.३९ |
| मे | १२०.९२ | १०३.२४ | ११५.३७ | ११२.५२ | १०९.५७ | ११६.७५ |
| जून | ११०.०२ | १०९.७६ | ९७.२७ | ९९.४३ | १०१.३९ | ९८.६९ |
| जुलै | १०९.२३ | १०४.७४ | १००.९८ | ९८.८७ | १०७.४९ | ११५.२३ |
| ऑगस्ट | ११०.०३ | १०७.२८ | ११२.०४ | १०२.३३ | १००.२५ | १००.४१ |
| सप्टेंबर | १०३.३६ | १०७.३४ | ९८.५९ | ९५.२३ | ९२.८७ | ११०.५५ |
| ऑक्टोबर | ९६.५९ | १०७.९१ | १०६.४४ | १०७.१६ | १०२.१९ | ११८.६५ |
| नोव्हेंबर | ८८.५९ | १०१.२१ | १००.२७ | ९८.६६ | ८३.९४ | ३३.२३ |
| डिसेंबर | ११३.३९ | १०२.३९ | ९८.१५ | ९२.३५ | ९१.५३ | १९५.९० |

| | १९२३ | १९२४ | १९२५ | १९२६ | १९२ |
|---|---|---|---|---|---|
| जानेवारी | १०८.०१ | १२७.३३ | १११.६१ | १०१.३१ | ९९. |
| फेब्रुवारी | ८४.०४ | ९०.०८ | ७५.०८ | ८६.७९ | ९३. |
| मार्च | १११.०० | ८७.२९ | ९६.५२ | ९९.०५ | ११३. |
| एप्रिल | ९०.९४ | ७३.७० | ८९.५५ | ८६.८८ | ५७. |
| मे | १०७.२६ | १०६.०८ | १०५.२८ | ९७.४६ | १०२. |
| जून | ९८.७२ | ९७.४६ | १०४.७६ | १०७.५१ | १०२. |
| जुलै | ९९.२१ | १०६.०१ | १०६.४९ | १०३.५१ | ९२. |
| ऑगस्ट | १०८.२९ | १०७.७१ | ११३.३९ | १०६.६४ | १२३. |
| सप्टेंबर | ९४.५८ | ११७.९८ | १०४.३२ | १०५.६६ | १००. |
| ऑक्टोबर | १०६.४२ | ११४.२३ | ११३.६४ | १११.४७ | १०४. |
| नोव्हेंबर | ८७.२७ | ८७.९७ | ९५.४५ | १०९.३८ | ९२. |
| डिसेंबर | ९२.८२ | १०९.९० | १०४.०० | ९६.५७ | १०१. |

## सारणी–२०

आर्त्तव–विचरण–संगणना.

( सापेक्ष–बंध रीती)

| महिना | मध्यगा सापेक्ष-बंध (१) | साखळी सापेक्ष (२) | शोधित साखळी–सापेक्ष (३) |
|---|---|---|---|
| जानेवारी | १०७·५ | १००·० | १००·० |
| फेब्रुवारी | ८७·५ | ८७·५ | ८५·९ |
| मार्च | १०२·६ | ८९·८ | ८६·६ |
| एप्रिल | ८७·२ | ८७·३ | ८३·६ |
| मे | १०९·२ | ९५·३ | ८९·० |
| जून | १०१·६ | ९६·८ | ८८·९ |
| जुलै | १०२·३ | ९९·१ | ८९·६ |
| ऑगस्ट | १०८·५ | १०७·५ | ९६·४ |
| सप्टेंबर | १०१·५ | १०९·१ | ९६·५ |
| ऑक्टोबर | १०९·० | ११८·९ | १०४·७ |
| नोव्हेंबर | ९१·९ | १०९·३ | ९३·५ |
| डिसेंबर | १०१·२ | ११०·६ | ९३·२ |
| जानेवारी | १०७·५ | ११८·९ | १००·० |

( २ ) आलेल्या निष्पत्ति ( वास्तविक / प्रवृत्ति ) अर्हांचा एकूण कालखंडातील वर्षाकरिता मासिक-माध्य काढा. असा माध्य घेतांना न्यासातील आत्यंतिक चरम-अर्हा बाद कराव्या, कारण त्यामुळे समान्तर–मध्यक विरूपित होते.

( ३ ) येणारा परिणाम हा न्यासातील आर्त्तव देशनांक दर्शित करतो ( सारणी २१ ).

( ४ ) आर्त्तव-देशनांकाच्या ह्या मासिक अर्हा जर निष्पत्ति–अर्हांतून बाद केल्या तर श्रेणीतील आर्त्तव–विचरणे त्यामुळे निरसित होतील; व मग फक्त चक्रिक व समसंभावी विचरणांच्या संचयनामुळे प्राप्त परिणामच तेवढे शिल्लक राहतात.

## सारणी–२१

### आर्त्तव व चक्रिक उच्चावचनांचे मापन.
( निष्पत्ती – ते –प्रवृत्ती रीती )
१९१९ ते १९३३ दरम्यान दिलेले रस्ते–बांधणीचा ठेका
( फक्त दोन वर्षांकरिता )

| (१) वर्ष व महिना | | (२) (का) दिलेला ठेका | (३) (ना) प्रवृत्ती | (४) का/ना | (५) (१+धा) आर्त्तव देशनांक | (६) (गा+दा) चक्रिक व समसंभावी |
|---|---|---|---|---|---|---|
| | | (दशलक्ष स्के. यार्ड) | | | | |
| १९१९ | जानेवारी | ०·२७ | ५·१७ | ०·०५ | ०·५१ | –०·४६ |
| | फेब्रुवारी | ०·७८ | ५·२० | ०·१५ | ०·५७ | –०·४२ |
| | मार्च | २·३७ | ५·२३ | ०·४५ | १·०२ | –०·५७ |
| | एप्रिल | ५·०१ | ५·२६ | ०·९५ | १·६४ | –०·६९ |
| | मे | ९·४३ | ५·२९ | १·७८ | १·५० | ०·२८ |
| | जून | ६·६१ | ५·३३ | १·२४ | १·३७ | –०·१३ |
| | जुलै | ५·७५ | ५·३६ | १·०७ | १·१८ | –०·११ |
| | ऑगस्ट | ८·१५ | ५·३९ | १·५१ | १·१६ | ०·३५ |
| | सप्टेंबर | ३·८४ | ५·४२ | ०·७१ | ०·९९ | –०·२८ |
| | ऑक्टोबर | २·७९ | ५·४५ | ०·५१ | ०·८० | –०·२९ |
| | नोव्हेंबर | २·०१ | ५·४८ | ०·३७ | ०·५९ | –०·२२ |
| | डिसेंबर | ३·११ | ५·५२ | ०·५६ | ०·६७ | –०·११ |
| १९२० | जानेवारी | १·९६ | ५·५५ | ०·३५ | ०·५१ | –०·१६ |
| | फेब्रुवारी | ४·२२ | ५·५८ | ०·७६ | ० ५७ | ०·१९ |
| | मार्च | ६·२५ | ५·६१ | १·११ | १·०२ | ०·०९ |
| | एप्रिल | ५·७९ | ५·६४ | १·०३ | १·६४ | –०·६१ |
| | मे | ५·६१ | ५ ६८ | ०·९९ | १·५० | –०·५१ |
| | जून | २·९४ | ५·७१ | ०·५१ | १·३७ | –०·८६ |
| | जुलै | २·६३ | ५·७४ | ०·४६ | १·१८ | –०·७२ |
| | ऑगस्ट | २·०४ | ५·७७ | ०·३५ | १·१६ | –०·८१ |
| | सप्टेंबर | २·९५ | ५·८० | ०·५१ | ०·९९ | –०·४८ |
| | ऑक्टोबर | १·४५ | ५·८३ | ०·२५ | ०·८० | –०·५५ |
| | नोव्हेंबर | १·३२ | ५·८७ | ०·२२ | ०·५९ | –०·३७ |
| | डिसेंबर | २·०१ | ५·९० | ०·३४ | ०·६७ | –०·३३ |

( पोर्टलँड सिमेंट असोसिएशन वरून )

## सारणी–२२

आर्त्तव–देशनांक=संगणना ( निष्पत्ती–ते–प्रवृत्ती रीती )

| महिना | मासिक योग १९१९–१९३३ | एकूण मास | मासिक माध्य |
|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) |
| जानेवारी | ७·६५ | १५ | ०·५१ |
| फेब्रुवारी | ८·५४ | १५ | ०·५७ |
| मार्च | १५·४० | १५ | १·०२ |
| एप्रिल | २३·०२ | १४ | १·६४ |
| मे | १८·११ | १२ | १·५० |
| जून | १९·२९ | १४ | १·३७ |
| जुलै | १७·७८ | १५ | १·१८ |
| ऑगस्ट | १७·३९ | १५ | १·१६ |
| सप्टेंबर | १४·८६ | १५ | ०·९९ |
| ऑक्टोबर | १२·०८ | १५ | ०·८० |
| नोव्हेंबर | ८·८७ | १५ | ०·५९ |
| डिसेंबर | १०·०४ | १५ | ०·६७ |

---

# प्रकरण ९

# सह-संबंध

वर्तुळाचा परिघ हा त्याच्या त्रिज्येच्या २ ग पट असतो. मनुष्याच्या उंचीत व त्याच्या वजनांतही असाच काहीसा संबंध असतो. पण हा संबंध वर्तुळाच्या परिघाचा त्याच्या त्रिज्येशी जो संबंध असतो, तसा व तितका नियमित व स्थिर नसतो. पहिल्या प्रकारचे संबंध हे गणित, पदार्थविज्ञान, रसायन, यासारख्या भौतिकी शास्त्रांचा विषय होत. संख्याशास्त्रात दुसऱ्या प्रकारच्या संबंधाचा विचार अंतर्भूत असतो. उदाहरणार्थ, मनुष्यास मिळणारी मजुरी व त्याच्या राहणीमानाचा खर्च. विद्यार्थ्यास परीक्षेत मिळालेले गुण व त्याच्या ठायी असलेली बुद्धिमत्ता वीज-वहाळीतून वाहणारा विजेचा प्रवाह व त्यामुळे घडणाऱ्या रासायनिक प्रक्रियेत जमा होणारे द्रव्य, इत्यादि.

सांख्यिकीत अशा संबंधास **सहसम्बन्ध** असे म्हणतात. दोन संबंधित राशींतील अथवा श्रेणीतील ह्या सहसम्बन्धाची तपासणी व मापन ज्या विधीमुळे शक्य होते, त्या विधीस **सहसम्बन्ध विधी** असे म्हणतात. ह्या दोन राशी जेव्हा परस्परानुरोधाने चलित होतात तेव्हा त्यास **सहसम्बन्ध-राशी** असे म्हणतात. अशा वेळेस एका राशीत घडून येणाऱ्या बदलांच्या अनुरोधाने दुसऱ्या राशीतही बदल संभवतात. हे परिवर्तन जर एकाच प्रवृत्तीचे असेल तर त्यास **प्रत्यक्ष-सहसम्बन्ध** असे म्हणतात. सदर परिवर्तन परस्पर–विरुद्ध असेल तर त्यास **प्रतीप–सहसम्बन्ध** असे म्हणतात.

सहसम्बन्धाची ही कल्पना दिलेल्या न्यासाच्या चित्रांकणावरून आपणास चटकन होऊ शकते. दोन श्रेणींतील न्यासाच्या असल्या चित्रांकणास **विक्षेप-चित्र** असे म्हणतात. अशा तऱ्हेचे एक विक्षेप–चित्र आकृती २३ मध्ये दिले आहे.

### सहसम्बन्धाचे मापन

दोन राशींतील संबंध **सहसम्बन्ध** मापांकाने मोजला जातो. त्याकरिता त्या राशींच्या संबंधातील प्रवृत्तीचे मापन सम्बन्धादिक रेषेने करावयास हवे. त्यानंतर त्या सम्बन्धातील प्रवृत्तीचे ह्या रेषेपासूनचे विचलन काय हेही कळणे फायदेशीर असते. **सम्बन्धादिक्-रेषा,** त्याचे प्रमाप-विभ्रम तथा दोन चलांतील **सहसम्बन्ध मापांक** ह्या सर्वांच्या मापनास्तव ज्या दोन क्रिया उपयोगात आहेत, त्या अशा:–

(१) अल्पतम वर्ग रीती.

(२) गुणनफल-परिघात रीती.

दोन चलांतील सरल-रेखीय सहसम्बन्धाचाच विचार ह्या प्रकरणात केला आहे.




आकृती २३ : २२, डी ७—कॅटरपिलर ट्रॅक्टरचे कामाचे एकूण तास व खर्च झालेल्या डिझेलचे विक्षेप चित्र, त्यांतील सम्बन्धादिक् रेषेसह.

## सारणी-२३

२२, डी ७--कॅटरपिलर-ट्रॅक्टरचे वार्षिक कामाचे तास, व त्याकरिता लागलेले डिझेल-तेल ( गॅलनमध्ये )...

| एकूण कामाचे तासः ...... | एकूण खर्च झालेले डिझेल |
|---|---|
| ० | २० |
| १७३ | ६९७ |
| ३३१ | ७०७ |
| ३८६ | १०५९ |
| ८१७ | २४०८ |
| ८९५ | २७३१ |
| १०१२ | ३३५५ |
| १०६३ | २२७८ |
| १०६९ | ३२८६ |
| १११९ | ३३४१ |
| ११६७ | २५४१ |
| ११७० | ३३७४ |
| १२४१ | ३६१५ |
| १३०७ | ४२६९ |
| १३७० | ३८०६ |
| १४५२ | ४२८४ |
| १४६६ | ३३६६ |
| १५०३ | ४०४३ |
| १५४० | ४२३७ |
| १५८५ | ३४८७ |
| १५८५ | ४३१९ |
| २४७२ | ७३६८ |

[ मूळ = एका ट्रॅक्टर विभागाचा अप्रकाशित न्यास. ]

ह्या न्यासावर आधारित विक्षेप-चित्र आकृती २३ मध्ये दिले आहे. प्रांकित बिन्दूतून जाणाऱ्या रेषेस सम्बन्धदिक्-रेषा असे नाव आहे. ही रेषा अल्पतमवर्गरेषा असून तिचे मापन अल्पतमवर्गरीतीने खाली दिल्याप्रमाणे करावे.

## सारणी–२४

### सम्बन्धादिक्–रेषेचे आगणन

२२, डी ७–कॅटरपिलर ट्रॅक्टरचे वार्षिक कामाचे तास व त्याकरिता खर्च झालेले

| अनुक्रम | एकूण कामाचे तास य. | खर्चलेले डिझेल [ गॅलनमध्ये ] र. | य² | र |
|---|---|---|---|---|
| १ | ० | २० | ० | ४०० |
| २ | १७३ | ६९७ | २९,९२९ | ४८५,८ |
| ३ | ३३१ | ७०७ | १०९,५६१ | ४९९,८ |
| ४ | ३८६ | १०५९ | १४८,९९६ | १,१२१ |
| ५ | ८१७ | २४०८ | ६६७,४८९ | ५,७९८ |
| ६ | ८९५ | २७३१ | ८०१,०२५ | ७,४५८ |
| ७ | १०१२ | ३३५५ | १,०२४,१४४ | ११,२५ |
| ८ | १०६३ | २२७८ | १,१२९,९६९ | ५,१८९ |
| ९ | १०६९ | ३२८६ | १,१४२,७६१ | १०,७९ |
| १० | १११९ | ३३४१ | १,२५२,१६१ | ११,१६ |
| ११ | ११६७ | २५४१ | १,३६१,८८९ | ६,४५६ |
| १२ | ११७० | ३३७४ | १,३६८,९०० | ११,३८ |
| १३ | १२४१ | ३६१५ | १,५४०,०८१ | १३,०६ |

| अनुक्रम | एकूण कामाचे तास | खर्चलेले डिझेल [ गॅलनमध्ये ] र | य² | र |
| --- | --- | --- | --- | --- |
| १४ | १३०७ | ४२६९ | १,७०८,२४९ | १८,२ |
| १५ | १३७० | ३८०६ | १,८७६,९०० | १४,४ |
| १६ | १४५२ | ४२८४ | २,१०८,३०४ | १८,३ |
| १७ | १४६६ | ३३६६ | २,१४९,१५६ | ११,३ |
| १८ | १५०३ | ४०४३ | २,२५९,००९ | १६,३ |
| १९ | १५४० | ४२३७ | २,३७१,६०० | १७,९ |
| २० | १५८५ | ३४८७ | २,५१२,२२५ | १२,१ |
| २१ | १५८५ | ४३१९ | २,५१२,२२५ | १८,६ |
| २२ | २४७२ | ७३६८ | ६,११०,७८४ | ५४,२ |
| एकूण | २४,७२३ | ६८,५९१ | ३४,१८५,३५७ | २६६, |

वरील अर्हा अल्पतमवर्ग रीतीतील प्रसामान्य समीकारांत समाविष्ट केल्यास खालील समीकार येतात—

$$६८,५९१ = २२ क + २४,७२३ य.$$

$$९४,७७८,७२४ = २४,७२३ क + ३४,१८५,३५७ ख.$$

समयामिक रीतीने हे समीकार सोडविल्यास

$$क = ११·३१$$

$$ख = २·७६$$

ह्या अर्हा येतात. सारणी २३ मधील न्यासाकरिता येणारा आगणित समीकार असा:—

$$र = ११·३१ + २·७६ य$$

ह्या समीकाराने दर्शविली जाणारी रेषा आकृती २३ मध्ये 'अत्र'ने दाखविली आहे. ह्या आकृतीवरून हेही दिसून येईल की, प्रांकित बिन्दूंपैकी काही रेषेवर अथवा रेषेजवळ आहेत. परन्तु काही सदर रेषेपासून बरेच दूर आहेत. 'अत्र' ह्या रेषेस सम्बन्धदिक् रेषा असे म्हणतात. ह्या रेषेपासून प्रांकित बिन्दूंचे जे अन्तर आहे, त्यास विक्षेप असे म्हणतात. सम्बन्धादिक्–रेषेभोवतालच्या ह्या विक्षेपवर्गांच्या विस्ताराचे मारांकास आगणकाचे प्रमाप–विभ्रम असे म्हणतात. पूर्वीच्या प्रकरणातून वर्णिलेल्या प्रमाप–विचलनासारखेच ह्याचे रूप आहे.

| प्रमाप–विचलनामुळे समान्तर–मध्यकेभोवतीच्या विक्षेपाचे मापन होते; तर आगणकातील प्रमाप–विभ्रमाने सम्बन्धादिक्–रेषेभोवतीच्या विक्षेपाचे मापन होते. $ध_र$ ने जर आगणकातील प्रमाप–विभ्रम दर्शविला तर प्रमाप विचलनानुसार त्याचे सूत्र असे:— |
|---|

$$ध_र = \sqrt{यो_ध^2 / डा.} \qquad (३७)$$

प्रमाप–विचलनासारखाच प्रमाप–विभ्रमाचाही उपयोग आहे. समान्तर–मध्यकेच्या दोहो बाजूंस १–धि अन्तरात ६८ प्रतिशत राशी–अर्हा येतात. अगदी तसेच, ह्या प्रमाप–विभ्रमातही सम्बन्धदिक्–रेषेच्या दोहो बाजूंस १–$ध_र$ अंतरात एकूण ६८ प्रतिशत राशी–अर्हा येतात.

| प्रमाप–विभ्रम | ...... | प्रतिशत राशी–अर्हा |
|---|---|---|
| ०·६७४५ $ध_र$ | ...... | ५० % |
| १·०००० ,, | ...... | ६८ ,, |
| २·०००० ,, | ...... | ९५ ,, |
| ३·०००० ,, | ...... | ९९·७ ,, |

$$\text{धि}\bar{\text{य}}_{1}^{\,२} + \bar{\text{य}}_{२} = ४ + ६\cdot२५ = १०\cdot२५ \text{ यार्ड.}$$

$$\therefore\ \text{धि}\bar{\text{य}}_{1} + \bar{\text{य}}_{२} = ३\cdot२० \text{ यार्ड.}$$

( २ ) सदर मापांकाच्या 'ड' घाताकरिता हे प्रमाप–विभ्रम असे :

$$\frac{\text{धि}\bar{\text{य}}^{\text{ड}}}{\bar{\text{या}}^{\text{ड}}} = \text{डा}\left(\frac{\text{धि}\bar{\text{य}}}{\bar{\text{या}}}\right) \qquad (१००)$$

एका आयताच्या एका बाजूच्या सरासरीचा माध्य. १० फूट आहे व त्याचे प्रमाप–विभ्रम ०·५ फूट आहे. त्याच्या क्षेत्रफळाचे प्रमाप–विभ्रम खालील प्रकारे येईल.

$$\text{क्षेत्रफळ} = (\text{ लांबी })^{२} = १०^{२} = १०० \text{ स्के. फूट.}$$

$$\frac{\text{धि}\bar{\text{य}}^{\text{ड}}}{१००} = २\left(\frac{\cdot०५}{१०}\right) = ०\cdot१ \text{ स्के. फूट.}$$

( ३ ) प्रमाप–विभ्रम माहीत आहे अशा माध्यांच्या एका श्रेणीच्या गुणन–फलाचा प्रमाप–विभ्रम हा —

$$\left(\frac{\text{धि}\bar{\text{य}}_{1}\cdot\bar{\text{य}}_{२}\cdots\bar{\text{य}}^{\text{ड}}}{\bar{\text{या}}_{1}\cdot\bar{\text{या}}^{२}\cdots\bar{\text{या}}_{\text{ड}}}\right)^{२} = \left(\frac{\text{धि}\bar{\text{य}}_{1}}{\bar{\text{या}}_{1}}\right)^{२} + \left(\frac{\text{धि}\bar{\text{य}}_{२}}{\bar{\text{या}}_{२}}\right)^{२} + \ldots$$

$$\ldots\ldots + \left(\frac{\text{धि}\bar{\text{य}}^{\text{ड}}}{\bar{\text{या}}_{\text{ड}}}\right)^{२} \qquad (१०१)$$

( ४ ) लब्धीचा प्रमाप–विभ्रम हा

$$\left(\frac{\text{धि}\bar{\text{य}}_{1}\ /\ \bar{\text{य}}_{२}}{\bar{\text{या}}_{1}\ /\ \bar{\text{या}}_{२}}\right)^{२} = \left(\frac{\text{धि}\bar{\text{य}}_{1}}{\bar{\text{या}}}\right)^{२} + \left(\frac{\text{धि}\bar{\text{य}}_{२}}{\bar{\text{या}}_{२}}\right)^{२} \qquad (१०२)$$

ह्या सूत्राने उपलब्ध होऊ शकेल.

एक वर्तुळाकृती हौद आहे. त्याच्या उंचीचे व त्रिज्येचे मापांक आणि प्रमाप–विभ्रम असे:—

त्रिज्या = १० फूट ( द ). उंची = २० फूट ( ज )

$$\text{फा} = \text{प्या} \times \text{द}^{२}\cdot\text{ज} = ३\cdot१८१५९\ (१०)^{२}\cdot(२०) = ६२८३\cdot१८$$

आणि $\text{धि}_{\text{द}} = ०\cdot१$ फूट; $\text{धि}_{\text{ज}} = ०\cdot२$ फूट.

$\text{द}^{२}$ चे प्रमाप–विभ्रम असे:—

$$\frac{\text{धि}_{\bar{\text{य}}^{\text{ड}}}}{\bar{\text{या}}^{\text{ड}}} = \text{डा.}\ \frac{\text{धि}_{\bar{\text{य}}}}{\bar{\text{या}}} = \frac{\text{धि}_{\text{द}^{२}}}{\text{द}^{२}} = २\,\frac{\text{धि}_{\text{द}}}{\text{द}} = \left( २ \times \frac{\cdot १}{१०} \right)$$

घनफळाचे प्रमाप–विभ्रम असे :

$$\left( \frac{\text{धि}_{\bar{\text{य}}_{१} \cdot \bar{\text{य}}_{२}}}{\bar{\text{या}}_{१} \cdot \bar{\text{या}}_{२}} \right)^{२} = \left( \frac{\text{धि}_{\bar{\text{य}}_{१}}}{\bar{\text{या}}_{१}} \right)^{२} + \left( \frac{\text{धि}_{\bar{\text{य}}_{२}}}{\bar{\text{या}}_{२}} \right)^{२} \qquad (१०३)$$

परन्तु $\text{फा} = \text{प्या} \cdot \text{द}^{२} \cdot \text{ज}.$

$$\left( \frac{\text{धि}_{\text{फा}}}{\text{फा}} \right)^{२} = \left( \frac{\text{धि}_{\text{फा}}^{\ २}}{\text{द}^{२} \cdot \text{ज}} \right) = \left( २\,\frac{\text{धि}_{\text{द}}^{\ २}}{\text{द}} \right)^{२} + \left( \frac{\text{धि}_{\text{ज}}}{\text{ज}} \right)^{२}$$

$$\left( \frac{\text{धि}_{\text{फा}}}{६२८३\cdot१८} \right)^{२} = \left( २ \times \frac{\cdot १}{१०} \right)^{२} + \left( \frac{\cdot २}{१०} \right)^{२}$$

$$\therefore\ \text{धि}_{\text{फा}} = १४०\cdot५ \text{ घनफूट.}$$

**सहसम्बन्ध मापांकाची सार्थकता :**

दोन श्रेणींतील सहसम्बन्ध प्रस्थापित झाल्यानंतर आलेला सहसम्बन्ध–मापांक हा खरोखरीच त्या श्रेणीतील सत्य अशा सम्बन्धाचे प्रतीक आहे किंवा नाही हे पडताळून पाहणे श्रेयस्कर होय.

न्यादर्शांच्या दोन श्रेणींत सत्य-संबंध नसूनही समग्रातून निवडलेल्या ह्या श्रेणींचा 'द' मोजणे शक्य आहे. एकाच समग्रापासून निवडलेल्या दोन न्यादर्शांच्या माध्यात फरक असतो, हे मागेच सिद्ध केले आहे. त्याचप्रमाणे सहसम्बन्ध-मापांकाची ही 'द'–अर्हाही निदर्शनातील विचलनामुळे उद्भवू शकते.

युग्म अर्हांच्या असंख्य न्यादर्शांचे सहसम्बन्ध–मापांक आगणित करून वारंवारता वंटनात मांडल्यास येणारे बंटनही प्रसामान्यच असते. ह्या बंटनातील 'द'ची अर्हा ही प्रमाप–विचलनाच्या तिपटीपेक्षा आधिक अशी फक्त अवसरामुळेच शक्य आहे. आगणित असा हा 'द', जर '$\text{धि}_{\text{द}}$' पेक्षा अधिक असेल तर १०० त ९९·७ सदर 'द' सार्थच म्हणावा लागेल.

न्यादर्शामुळे उद्भवणारा हा विभ्रम निश्चित करण्याकरिता श्रेणीतील सह-सम्बन्ध मापांकाच्या प्रमाप-विभ्रमाचे गणन माध्याच्या प्रमाप-विभ्रमाप्रमाणेच करावे.

अवलोकित व वास्ताविक 'द'च्या अर्हेतील अन्तर पन्नास टक्के तरी ०·६७४५ 'धि' पेक्षा अधिक नसते, आणि ९९·७ टक्के ते ३ $धि_{द}$ पेक्षा अधिक नसते.

सहसम्बन्ध–मापांकाच्या प्रमाप-विभ्रमाकरिता खालील सूत्र वापरावे.

$$धि_{द} = \frac{१ - द^{२}}{\sqrt{डा}} \qquad (१०४)$$

नियुक्त समग्राकरिता सहसम्बन्ध-मापांक १०० टक्क्यांपर्यंत आल्यास निदर्शन बंटन प्रसामान्य अथवा संमित असणेच शक्य नाही; कारण मग बंटनाच्या एका भागातील चरम अर्हा ह्या 'द'च्या १०० टक्के अर्हेइतपत असतील; व दुसऱ्या भागातील 'द'चा विस्तार हा त्यापेक्षाही अधिक असेल. अशा वेळेस विश्वसनीयता व सार्थकतेकरिता 'द'–ची अर्हा 'ल' मध्ये रूपांतरित करावी.

$$ल = \frac{१}{२}\left[ छे_{वा}\,(१ + द) - छे_{वा}\,(१ - द) \right] \qquad (१०५)$$

सदर न्यादर्शांच्या बंटन अर्हा प्रसामान्य व संमितीय अशा असतात.

त्याचा प्रमाप-विभ्रम असा :

$$धि_{ल} = \frac{१}{\sqrt{डा - ३}} \qquad (१०६)$$

**लहान न्यादर्श : माध्याचे प्रमाप–विभ्रम :**

न्यादर्शात कमी पदे असल्यास (३० पेक्षा कमी) गंभीर असे विभ्रम निर्माण होतात. त्यामुळे वरील तऱ्हेचे प्रमाप-विभ्रम उपयोगाचे नाही.

न्यादर्श लहान असल्यास प्रमाप-विभ्रम नवीन तऱ्हेने आगणित करावा.

$$ध^{२} = \frac{यो\,(य)^{२}}{डा - १} = \frac{डा \cdot धि^{२}}{डा - १} \qquad (१०७)$$

$$धा_{य} = \frac{ध}{\sqrt{डा}}$$

लहान न्यादर्शांच्या बाबतीत प्रमाप-विभ्रमाच्या पटीत येणारी पदांची टक्केवारीही पूर्वीसारखी नसते. तिसांपेक्षा कमी पदे असलेल्या न्यादर्शांच्या संबंधांतील विचलनांची ही संभाविता, त्याकरिता आवश्यक अशा गुणकासह खाली दिली आहे.

| ढा | ५०% | ९५% | ९९% |
|---|---|---|---|
| १ | १.००० | १२.७०६ | ६३.६५७ |
| २ | .८१६ | ४.३०३ | ९.९२५ |
| ३ | .७६५ | ३.१८२ | ५.८४१ |
| ४ | .७४१ | २.७७६ | ४.६०४ |
| ५ | .७२७ | २.५७१ | ४.०३२ |
| ६ | .७१८ | २.४४७ | ३.७०७ |
| ७ | .७११ | २.३६५ | ३.४९९ |
| ८ | .७०६ | २.३०६ | ३.३५५ |
| ९ | .७०३ | २.२६२ | ३.२५० |
| १० | .७०० | २.२२८ | ३.१६९ |
| ११ | .६९७ | २.२०१ | ३.१०६ |
| १२ | .६९५ | २.१७९ | ३.०५५ |
| १३ | .६९४ | २.१६० | ३.०१२ |
| १४ | .६९२ | २.१४५ | २.९७७ |
| १५ | .६९१ | २.१३१ | २.९४७ |
| १६ | .६९० | २.१२० | २.९२१ |
| १७ | .६८९ | २.११० | २.८९८ |
| १८ | .६८८ | २.१०१ | २.८७८ |
| १९ | .६८८ | २.०९३ | २.८६१ |
| २० | .६८७ | २.०८६ | २.८४५ |
| २१ | .६८६ | २.०८० | २.८३१ |
| २२ | .६८६ | २.०७४ | २.८१९ |
| २३ | .६८५ | २.०६९ | २.८०७ |
| २४ | .६८५ | २.०६४ | २.७९७ |
| २५ | .६८४ | २.०६० | २.७८७ |
| २६ | .६८४ | २.०५६ | २.७७९ |
| २७ | .६८४ | २.०५२ | २.७७१ |
| २८ | .६८३ | २.०४८ | २.७६३ |
| २९ | .६८३ | २.०४५ | २.७५६ |
| ३० | .६८३ | २.०४२ | २.७५० |

## लहान न्यादर्श : इतर प्रमाप-विभ्रम

लहान न्यादर्शसम्बन्धातील इतर सांख्यिकीय मापांकांचे प्रमाप-विभ्रम खाली दिले आहेत. हे प्रमाप-विभ्रम मोठ्या न्यादर्शांतील प्रमाप-विभ्रमानुसार उपयोगात आणावे. त्याकरिता वर दिलेले अचूक असे गुणक उपयोगात आणावे.

| माप : | लहान न्यादर्शाकरिता प्रमाप-विभ्रम | वरील सारणीतील डांची अर्हा |
|---|---|---|
| दोन माध्यांतील अन्तर | $घ^२ = \frac{यो(यो_१)^२ + यो(य_२)^२}{(डा_१-१)+(डा_२-१)}$ <br> $धा_घ = \frac{घ}{\sqrt{\frac{डा १ \cdot डा २}{डा १ + डा २}}}$ | $डां = डा_१ + डा_२$ |
| सहसम्बन्ध मापांक | $धा_द = \frac{१ - द^२}{\sqrt{डा - २}}$ | $डां = डा - २$ |
| 'ल'मध्ये सहसम्बन्ध मापांक | $धि_ल = \frac{१}{\sqrt{डा - ३}}$ | मोठ्या न्यादर्शांचे गुणक वापरावे. |

---

प्रकरण १५

# वारंवारता बंटन विश्लेषण

## परिघात

वारंवारता बंटनाचे अधिक परिशुद्ध विश्लेषण त्यातील अचल अथवा "परिघात" संगणित केल्यास शक्य आहे. बंटनाच्या स्पष्ट विवरणार्थ व त्याच्या सरलनार्थ जे वक्र निश्चित करावे लागते, त्याकरिताही परिघात ठरविणे इष्ट असते.

( १ ) स्वेच्छ मूल-बिन्दूपासून वारंवारता बंटनाचा प्रथम परिघात असा :

$$ऌ_{१} = \frac{\text{यो (च. घ)}}{\text{डा.}} \qquad (१०८)$$

( २ ) स्वेच्छ मूल-बिन्दूपासून वारंवारता बंटनाचा द्वितीय परिघात असा :

$$ऌ_{२} = \frac{\text{यो. च (घ}^{२}\text{)}}{\text{डा.}} \qquad (१०९)$$

( ३ ) स्वेच्छ मूल-बिन्दूपासून वारंवारता बंटनाचा तृतीय परिघात असा :

$$ऌ_{३} = \frac{\text{यो. च (घ}^{३}\text{)}}{\text{डा.}} \qquad (११०)$$

( ४ ) स्वेच्छ मूल-बिन्दूपासून वारंवारता बंटनाचा चतुर्थ परिघात असा :

$$ऌ_{४} = \frac{\text{यो. च (घ}^{४}\text{)}}{\text{डा.}} \qquad (१११)$$

माध्यास मूल-बिन्दू मानून ठरविलेले परिघात हेच मुख्य असतात, म्हणून—

$$ॠ_{१} = \frac{\text{यो. च (य)}}{\text{डा.}} = ० \qquad (११२)$$

$$ॠ_{२} = \frac{\text{यो. च (य}^{२}\text{)}}{\text{डा.}} \qquad (११३)$$

$$ॠ_{३} = \frac{\text{यो. च (य}^{३}\text{)}}{\text{डा.}} \qquad (११४)$$

$$ॠ_{४} = \frac{\text{यो. च. (य}^{४}\text{)}}{\text{डा.}} \qquad (११५)$$

ज्यात, $\text{य}$ = माध्य आणि मूळ–अर्हांतील फरक.

माध्यापासूनच्या विचलनांचा योग शून्य असतो; म्हणून प्रथम परिघात नेहमी शून्याबरोबर असतो. माध्यापासूनचे इतर संगणित परिघात असे :—

$$\text{ऋ}_{२} = \text{ल}_{२} - \text{ल}_{१}^{२} \qquad (११६)$$

$$\text{ऋ}_{३} = \text{ल}_{३} - ३\cdot\text{ल}_{१}\,\text{ल}_{२} + २\cdot\text{ल}_{१}^{३} \qquad (११७)$$

$$\text{ऋ}_{४} = \text{ल}_{४} - ४\cdot\text{ल}_{१}\,\text{ल}_{३} + ६\cdot\text{ल}_{१}^{२}\,\text{ल}_{२} - ३\text{ल}_{१}^{४} \qquad (११८)$$

## वर्गणाकरिता शेपर्डचे शोधन

संभागान्तरालातील सर्व अर्हा ह्या त्या संभागान्तरालाच्या मध्य-बिन्दूभोवतीच केन्द्रित झालेल्या असतात ही कल्पना वारंवारता बंटनाच्या परिघात-गणनेत गृहीत असते. ही कल्पना सर्वस्वी खरी नाही. वरील कल्पनेमुळे थोडा विभ्रम उत्पन्न होतो आणि ह्याकरिता शोधनाच्या रूपात परिघात-अर्हेत थोडीफार सूट द्यावी लागते.

(अ) प्रथम शोधित परिघात : $\text{ऋ}'_{१} = ०$ (११९)

(ब) द्वितीय शोधित परिघात : $\text{ऋ}'_{२} = \text{ऋ}_{२} - १/१२$ (१२०)

(क) तृतीय शोधित परिघात : $\text{ऋ}'_{३} = \text{ऋ}_{३}$. (१२१)

(ड) चतुर्थ शोधित परिघात : $\text{ऋ}'_{४} = \text{ऋ}_{४} - \frac{१}{२}\text{ऋ}_{२} + \frac{७}{२४०}$ (१२२)

सोयीकरिता वरील परिघात हे संभागान्तरालात संगणित केले जातात. मूळ एककात नव्हे ! म्हणून संभागान्तराल एककातून मूळ एककात बदलून घेण्याकरिता खालील सम्बन्धांचा उपयोग करावा.

$\text{ऋ}'_{२}$ ( मूळ एककात ) = $\text{गा}^{२}\cdot\text{ऋ}'_{२}$ ( संभागान्तराल एककात ) (१२३)

$\text{ऋ}'_{३}$ ( मूळ एककात ) = $\text{गा}.^{३}\text{ऋ}'_{३}$ ( संभागान्तराल एककात ) (१२४)

$\text{ऋ}'_{४}$ ( मूळ एककात ) = $\text{गा}.^{४}\text{ऋ}'_{४}$ ( संभागान्तराल एककात ) (१२५)

ज्यात $\text{गा}$ = वर्गणाकरिता उपयोगात आणलेल्या संभागान्तरालाचा आकार.

ही परिघात–गणना कशी करतात हे खालील सारणीवरून लक्ष्यात येईल.

## सारणी–४३

### परिघात गणना

'अत्र' कंपनीने उत्पादिलेल्या ६०० पितळी वॉशर्सच्या जाडीतील विचरणे

| इंचात जाडी | वारंवारता | संभागान्तरातील विचरण (स्वेच्छ मूलापासून) | | |
|---|---|---|---|---|
| | च | घं | चघं | च (घं² |
| ·०१८० – ·०१८३ | ६ | –५ | –३० | १५० |
| ·०१८४ – ·०१८७९ | ३० | –४ | –१२० | ४८० |
| ·०१८८ – ·०१९१९ | ४२ | –३ | –१२६ | ३७८ |
| ·०१९२ – ·०१९५९ | ६६ | –२ | –१३२ | २६४ |
| ·०१९६ – ·०१९९९ | ९४ | –१ | –९४ | ९४ |
| ·०२०० – ·०२०३९ | १२० | ० | ० | ० |
| ·०२०४ – ·०२०७९ | १०२ | १ | १०२ | १०२ |
| ·०२०८ – ·०२११९ | ६० | २ | १२० | २४० |
| ·०२१२ – ·०२१५९ | ५४ | ३ | १६२ | ४८६ |
| ·०२१६ – ·०२१९९ | १४ | ४ | ५६ | २२४ |
| ·०२२० – ·०२२३९ | १२ | ५ | ६० | ३०० |
| | ६०० | | –२ | २७१८ |

$$ऌ_1 = \frac{\text{यो ( चघं )}}{\text{डा}} = \frac{-२}{६००} = -०.००३३०$$

$$ऌ_2 = \frac{\text{यो. च ( घं}^2\text{ )}}{\text{डा}} = \frac{२७१८}{६००} = ४.५३००$$

$$ऌ_3 = \frac{\text{यो. च ( घं}^3\text{ )}}{\text{डा}} = \frac{१०}{६००} = ०.०१६७.$$

$$ऌ_4 = \frac{\text{यो. च ( घं}^4\text{ )}}{\text{डा}} = \frac{३२५०२}{६००} = ५४.१७००.$$

$$ऋ_1 = ०$$

$$ऋ_2 = ऌ_2 - ऌ_1^{2} = ४.५३०० - (०.००३३)^2$$
$$= ४.५२९९९$$

$$ऋ_3 = ऌ_3 - ३ऌ_1 \cdot ऌ_2 + २ऌ_1^{2}$$
$$= ०.०१६७ - ३ (०.००३३) (४.५३००) + २ (०.००३३)^2$$
$$= -०.४३१७७.$$

$$ऋ_4 = ऌ^4 - ४ऌ_1\, ऌ_3 + ६ऌ_1^{2} ऌ_2 - ३ऌ_1^{4}$$
$$= ५४.१७०० - ४ (०.००३३) ०.१६७ + ६ (.००३३)^2 ४.५३०० - ३ (०.००३३)^4$$
$$= ५४.१७००७६$$

$$ऋ'_1 = ०;\; ऋ'_2 = ऋ_2 - \tfrac{१}{१२} = ४.५२९९९ - .०८३३३$$
$$= ४.४४६६६$$

$$ऋ'_3 = ऋ_3 = -०.४३१७७$$

$$ऋ'_4 = ऋ_4 - \tfrac{१}{४} ऋ_4 + \tfrac{७}{२४०}$$
$$= ५४.१७००७६ - २.२६४९९५ + ०.०२९१६७$$
$$= ५१.९४४२९$$

**वक्र-प्ररूप निकष**

बंटन वर्णनार्थ जे वक्र शक्य आहे त्याचे ऐकात्म्य परिघात-अर्हाद्वारे त्या निकषाने होते. हे निकष खालीलप्रमाणे संगणित करावे.

$$आ_1 = ऋ_3^{2} / ऋ_2^{3}. \qquad (१२६)$$

आणि—

$$आ_२ = \frac{ऋ_४}{ऋ_२^२} = \frac{ऋ_४}{धि_४} \qquad (१२७)$$

व—

$$सि = \frac{आ_१ (आ_२ + ३)^२}{४ (४ आ_२ - ३ आ_१)(२ आ_२ - ३ आ_१ - ६)} \qquad (१२८)$$

बंटन वर्णनार्थ ज्या **पिअर्सन वक्राचे** ऐकात्म्य हवे आहे ते वक्र वरील निकष उपयोगात आणून निश्चित करता येईल.

### ककुद्–वक्रता

वारंवारता बंटनातील "शिखर–उंचीस" ककुद्–वक्रता असे म्हणतात. प्रसामान्य वक्रापेक्षाही ककुद्–वक्रता अधिक असल्यास ( आ > ३ ) त्या वक्रास **कूट–ककुद्मी** असे म्हणतात. हा 'आ' जर ३– पेक्षा कमी असेल तर त्या वक्राचे शिखर प्रसामान्य–वक्रापेक्षा अधिक सपाट असते. अशा वक्रास **चिपिट–ककुद्मी** असे म्हणतात.

ककुद्–वक्रतेचा मापांक खालीलप्रमाणे:—

$$आ_२ - ३ \qquad (१२९)$$

( १ ) येणारा परिणाम शून्य असेल तर वक्रास मध्य–ककुद्मी असे म्हणतात.

( २ ) येणारा परिणाम अधिक अथवा धन असेल तर वक्रास कूट–ककुद्मी असे म्हणतात.

( ३ ) येणारा परिणाम ऋण असल्यास वक्रास चिपिट–ककुद्मी असे म्हणतात.

सारणी ४३ मधील बंटनाची "आ–अर्हा" अशी :—

$$आ_२ = \frac{५१.९४४२९}{(४.४४६६६)^२} = २.६३$$

म्हणजे ( आ $_२$ – ३ ) ची अर्हा ऋण होय. अर्थात सारणी ४३ प्रमाणे आलेले वक्र चिपिट–ककुद्मी असले पाहिजेत.

### विषमतेचे इतर मापांक

बंटनातील विषमतेचा अधिक सुतथ्य निकष खालील रीतीने ठरवावा.

$$अ_३ = \frac{ऋ_३}{धि^३} = \sqrt{आ_१} \qquad (१३०)$$

प्रसामान्य–वक्राकरिता $अ_३$–ची अर्हा शून्य असते.

दुसरे एक सूत्र असेः—

$$क्ष = \frac{आ_१ \; (आ_२ + ३)}{२ \; (५ आ_२ - ६ आ_१ - ९)} \qquad (१३१)$$

ह्या 'क्ष' अर्हेवरून भूयिष्ठ हे अधिक चांगल्या तऱ्हेने निश्चित करता येते.

$$भू = \bar{य} - (क्ष) \; (धि) \qquad (१३२)$$

वरील 'क्ष' व $क्ष^२$– मधील 'क्ष'–हे अगदी भिन्न आहेत.

---

# न्यासाचे संग्रहण

## न्यासाचे एकत्रीकरण व संग्रहण

संख्यानीय न्यास हा प्राथमिक, मूळ सामग्रीपासून उपलब्ध होऊ शकतो. मुलाखत, प्रश्नावली अथवा पोस्टाद्वारे केलेली परिपृच्छा ह्या रीती प्राथमिक सामग्रीत मोडतात. द्वितीय सामग्रीपासूनही अशा तऱ्हेचा न्यास गोळा करण्यात येतो. दुसऱ्या एखाद्या व्यक्तीने अथवा इतर शाखांनी गोळा केलेला न्यास आपल्याकरिता निवडून घेणे हे द्वितीय प्रकारच्या सामग्रीत येते.

## प्राथमिक सामग्री

मुलाखत–पद्धतीचा उपयोग.

( १ ) सामग्रीशी प्रत्यक्ष संबंध आल्यामुळे एकत्रित केलेल्या न्यासात परिशुद्धतेचा अंश अधिक असतो.

( २ ) ह्या पद्धतीमुळे बराचसा असा न्यासही उपलब्ध होतो जो इतर दुसऱ्या प्रश्नावली वगैरेसारख्या पद्धतींनी केव्हाही हस्तगत होणार नाही.

( ३ ) मिळणारी माहिती खरी आहे किंवा खोटी आहे हे तत्काळ जागेवरच प्रत्यक्ष तपासून पाहता येते.

तोटे:

( १ ) ह्या पद्धतीने फक्त लहान न्यादर्शच हाताळले जाऊ शकतात.

( २ ) प्रत्यक्ष मुलाखतीत वैयक्तिक मताचा प्रभाव पडण्याची शक्यता जास्त असते.

( ३ ) ही पद्धती सर्वसाधारणतः अधिक कार्यक्षम अशी मानता येणार नाही; कारण त्यात पैशाचा व वेळेचा बराच अपव्यय होतो.

## प्रश्नावली पद्धतीची लक्षणे

( १ ) प्रश्न सहज समजण्यासारखे असावे.

( २ ) शक्य असल्यास तर्कशुद्धीरीत्या त्यांची मांडणी करावी.

( ३ ) प्रश्नांची उत्तरे संक्षिप्त असावी. साधारणतः हो किंवा नाही; मोकळ्या जागेत 'हो'–ची ( √ ) किंवा 'नाही' ची (×) खूण करणे;अथवा शक्य असल्यास फक्त आकड्याने दर्शन होण्याइतपतच ही उत्तरे सीमित असावी.

( ४ ) प्रश्नावली संक्षिप्त, साधी व थोडक्यात आटोपणारी असावी.

( ५ ) ही प्रश्नावली सोयिस्कर व चटकन उत्तर देता येईल अशी असावी.

( ६ ) प्रश्नावलीची मांडणीही अशी असावी की ज्यामुळे पुढील सारणीयन सहज शक्य होईल.

फायदे :

( १ ) ह्या पद्धतीने थोड्या वेळातून फार मोठ्या क्षेत्रातील असा न्यास सहज गोळा करता येतो.

( २ ) असा न्यास गोळा करण्याचा खर्चही तौलनिक दृष्ट्या ह्या पद्धतीत अधिक नसतो.

तोटे :

( १ ) बऱ्हंशी काही प्रश्नांची उत्तरे पूरक–विवरणाशिवाय देता येणे शक्य नसते.

( २ ) ह्या पद्धतीने बरेच वेळा येणारे परिणाम हे अगदी बिन–भरवशाचे असतात.

( ३ ) न्यादर्शातील फार मोठ्या विभागातर्फे उत्तरेच न येण्याचा संभव ह्या पद्धतीत बराच असतो.

## द्वितीय सामग्री

फायदे :

( १ ) बहुतेक न्यास संकलित झालेलाच असतो, त्यामुळे वेळ व पैसा या दोन्हींची बचत होते.

( २ ) न्यासातील परिशुद्धतेची जबाबदारी टाळणे ह्यात सहज शक्य असते.

तोटे :

( १ ) ह्या सामग्रीतील न्यास आधीच गोळा केलेला असल्याने तो किती अंशाने खरा आहे ह्याचे सत्यापन शक्य नसते.

( २ ) ज्या वेळेस हा न्यास गोळा केला त्या वेळेस नक्की कोणती संख्यानीय प्रक्रिया उपयोगात आणली होती तिचे ज्ञान नसल्याने न्यासाच्या परिणामाच्या परिशुद्धतेविषयी वर्तमानकाली सत्यापन करणे शक्य नाही.

( ३ ) मूळ सामग्रीतील न्यासाचे संकलन करताना अथवा नंतर आणि त्याचप्रमाणे त्याचे निर्वचनातही जो व्यक्तिगत प्रभाव त्यावर पडला असेल त्याचे परिणाम द्वितीय सामग्रीतही संभवतात.

( ४ ) अभ्यासाच्या हेतुनिष्ठतेप्रमाणे प्रथमार्धातच पूर्वग्रहदूषित दृष्टीने न्यासाचे संकलन व त्यावरील संख्यानीय प्रक्रिया घडली असण्याचा संभव आहे. शक्य आहे की त्यामुळे द्वितीय सामग्रीवरही त्याचा परिणाम होतो.

( ५ ) शक्य आहे की, प्रथम सामग्री संग्रहित करताना प्रातिनिधिकत्वाकडे दुर्लक्ष्य झाले असेल.

---

# प्रकरण १७

# संख्यानीय सारणी

इयत्तात्मक न्यासाच्या तुलनेसाठी स्तंभातून व रांगातून केलेल्या व्यवस्थित मांडणीस संख्यानीय सारणी असे म्हणतात.

संख्यानीय सारणीचे कारणपरत्वे दोन प्रकारांत संभाजन होते. सर्वसाधारण कारणासाठी केलेल्या सारणीयनास प्राथमिक सारणी असे म्हणतात. विशिष्ट कारणासाठी स्वीकारलेल्या सारणीयनास व्युत्पादित सारणी असे म्हणतात.

**सर्वसाधारण सारणीयन कार्य :**

( १ ) सर्वसाधारण कारणासाठी तयार केलेल्या सारणीचा मूळ हेतु संदर्भात्मक असतो.

( २ ) मूळ न्यासाची आवश्यकता आहे, अशा ठिकाणी ह्या सारणी मूळ वृत्तान्त पुरविण्याचे कार्य करतात.

( ३ ) विशिष्ट हेतूसाठी तयार होणाऱ्या सारणीच्या रचनेत त्यांचा उपयोग होतो.

**लक्षणे :**

( १ ) सर्वसाधारण सारणीवरून एकाच विषयावर विविध तऱ्हेची माहिती मिळू शकते.

( २ ) अशा सारणीतून निरपेक्ष अंक असावे. प्रतिशतता अंक त्यात नसावे.

( ३ ) अशा सारणीतील एकूण माहिती अशा रीतीने दर्शविलेली असावी की संदर्भ म्हणून ती सहज, केव्हाही उपलब्ध होऊं शकेल.

( ४ ) अशा सारणीतून वास्तविक असे जे अंक असतील तेच द्यावे. गोळाबेरीज म्हणून एकत्र केलेले अंक असू नयेत.

**विशिष्ट हेतूसाठी केलेले सारणीयन कार्य :**

( १ ) विशिष्ट हेतूसाठी तयार केलेल्या सारणींचा प्राथमिक उद्देश न्यासातील विशिष्ट संबंधाकडे लक्ष आकृष्ट करणे हा असतो.

( २ ) सर्वसाधारण सारणीतील साधारण वृत्तातील एक विशिष्ट अशी बाजू विशिष्ट दृष्टिकोनातून जोरदारपणे पुढे मांडणे हा विशिष्ट हेतूसाठी केलेल्या सारणीयनाचा मुख्य हेतु असतो.

( ३ ) निवडक वृत्त, थोडक्यात, सहजपणे दिग्दर्शित करणे, हा विशिष्ट हेतूच्या सारणीचा मुख्य उद्देश असतो.

लक्षणे :

अशा सारणीतून गोळाबेरीज अंक वापरण्यास हरकत नाही.

( २ ) विशिष्ट हेतूच्या सारणीत निर्वचनार्थ निवडलेले वृत्त लहान अवकाशात पण स्पष्टपणे दार्शित करता येते.

## सारणी–४४

शीर्षक : संयुक्त संस्थानांतील अशोधित लोखंडाचे उत्पादन व त्याच्या किंमती.

१९१९–१९३०

| पेटी–वृत्त<br>वर्ष | उत्पादन<br>एक ( हजार टनांत) | किंमत * स्तंभ–वृत्त<br>( डॉलरमध्ये खास ) |
|---|---|---|
| १९१९ | ३१,०१५ | २८·९७ |
| १९२० | ३६,९२६ | ४२·७६ |
| १९२१ | १६,६८८ | २२·५८ |
| १९२२ | २७,२२० | २४·०६ |
| १९२३ | ४०,३६१ | २६·३० |
| बुंधा १९२४ | ३१,४०६ | २०·९० |
| १९२५ | ३६,७०० | २०·५८ |
| १९२६ | ३९,३७८ | २०·४२ |
| १९२७ | ३६,५६६ | १८·५५ |
| १९२८ | ३८,१५६ | १७·६८ |
| १९२९ | ४२,६१४ | १८·४३ |
| १९३० | ३१,३९९ | १७·७३ |

* साताहिक–माध्य किंमती भट्टीवरील–पादवृत्त.

चिकागो व बर्मिंगहॅम येथील. आधार मूळ : लोहयुग.

**सारणीयनाचे नियम :**

संख्यानीय सारणीयनाचे सर्वसंमत साधारण असे नियम खाली दिले आहेत.

( १ ) **शीर्षक :** हे सारणीचे शीर्षक पूर्ण विवरणात्मक असावे. सारणीत काय असेल ह्याचा संपूर्ण बोध शीर्षक वाचूनच झाला पाहिजे.

खालील गोष्टींचाही शीर्षक वाचून उलगडा व्हावा.

( अ ) दर्शित न्यासाचे स्वरूपही त्यावरून उघड व्हावे.

( ब ) कोणत्या प्रदेशास सारणीतील न्यास लागू होतो हेही त्यावरून कळावे.

( क ) कोणत्या कालखंडापुरता सदर न्यास सीमित आहे, ह्याचाही बोध शीर्षकाद्वारे व्हावा.

सारणीच्या सुरुवातीस अगदी मध्यभागी पण वर असे हे शीर्षक असावे. शीर्षकाचे अक्षर हे साधारणतः सारणीतील अक्षर–अंकापेक्षा जाडसर व ठळक असे असावे.

( २ ) **उगम :** सारणीचा उगम अथवा तिचे मूळ कशात आहे हे दर्शविणे नेहमी हितावह असते. सारणीतील न्यास स्वतःच मिळविला असल्यास अथवा असा न्यास व्युत्पादित असल्यास मात्र ह्याची विशेष आवश्यकता नाही.

सारणीचा उगम कशात आहे, हे नमूद केल्याने;

( अ ) सारणीतील सदर न्यासाची जबाबदारी कशात आहे हे स्पष्ट होते.

( ब ) सारणीतील अंक एखाद्यास तपासून हवे असल्यास ते शक्य होते.

( क ) अधिक असा न्यास आणखी हवा असल्यास आधाराकडे संदर्भार्थ वळता येते.

आधार ( उगम ) हा सारणीच्या शेवटी अखेरीस सारणीच्या खाली पण डावीकडे टाकावा.

( ३ ) **पादवृत्त :**

सारणीतील पादवृत्ताचा उपयोग त्या सारणीत वापरलेल्या अंकाविषयी अधिक अशी माहिती देणे असा असतो. सारणीच्या शेवटी ती संपताच, पण आधाराच्या अगोदर हे पादवृत्त घालावे. सारणीत एखादे पादवृत्त आहे हे दाखविण्याकरिता संक्षिप्त चिन्हे ( अशी * + वगैरे ) वापरावी. त्याकरिता अक्षरेही वापरल्यास चालतील. परन्तु अंकाचा उपयोग मात्र करू नये; कारण चुकून सदर अंक सारणीचाच भाग आहे अशी समजूत झाल्यास घोटाळा होण्याचा बराच संभव असतो.

(४) **न्यासाची मांडणी :** सारणीतील पदे काळजीपूर्वक व्यवस्थित मांडल्यास सारणीचे वाचन सुलभ होते. न्यासाचे विश्लेषण व तुलनेस त्यामुळे बरीच मदत होते. विशिष्ट वर्गाच्या न्यासाचे महत्त्वही त्यामुळे स्पष्ट होते. सारणी-तील पदे खालील रीतीने मांडता येतात.

(अ) **वर्णानुक्रमाने :** पदांच्या वर्णाच्या अनुक्रमाने सारणीची मांडणी शक्य आहे. सर्वसाधारण सारणीयन ह्याच रीतीने बव्हंशी करण्यांत येते.

(ब) **कालक्रमानुसार :** एका कालखंडातील विषयांच्या तुलनेसाठी त्यांची मांडणी त्या विषयांच्या वृत्तान्तानुसार करावी. हा कालक्रम साधारणतः गतकालापासून अर्वाचीन कालापर्यंत बुंध्याच्यावरून सुरुवात करून खालपर्यंत, अथवा पेटीवृत्तात डावीकडून उजवीकडे, अशा पद्धतीने मांडावा.

(क) **भौगोलिक दृष्ट्या :** साधारणतः स्थानपरत्वे विषयाची मांडणी केल्यासही ती माहिती उपयुक्त असते. देश, प्रांत अथवा जिल्हानिहाय, किंवा शहर–गावानुसार हे सारणीयन असल्यास उत्तम ! सर्वसाधारण सारणीयनात अशा तऱ्हेची पद्धती साधारणतः संदर्भात अवलंबिली जाते.

(ड) **महत्तनुसार :** सारणीतील मांडणी आकारमानानुसारही करण्यात येते. सर्वात मोठा अंक सारणीच्या ऊर्ध्वभागी स्तंभांत प्रथन असतो. मग इतर अंक त्यांच्या महत्तेप्रमाणे एकाखाली एक द्यावे. रांगाचे वृत्त हे त्यांच्या किंमती-प्रमाणे असते. रांगातील हे वृत्त संख्यात्मक असल्यास (वारंवारता बंटनाच्या संभा-गान्तरालात असते तशी) त्याची मांडणीही महत्तेप्रमाणे असावी. अशा वेळेस ओळ अथवा रांग करताना लहान महत्तेपासून सुरुवात करून शेवटी–तळाशी–मोठ्यात मोठे पद असावे. स्तंभांच्या दृष्टीने विचार करिता सर्वात लहान पद डावी-कडे व मग अनुक्रमे उजवीकडे मोठी पदे अशी मांडणी असावी.

(फ) **सांप्रदायिक संभाजन :** काही काही बाबतीत सारणीयनाची पद्धती ही नियम म्हणूनच ठरलेली असते. त्यात कोणत्याहि तऱ्हेचा बदल संभवत नाही. उदाहरणार्थ : "पुरुष, स्त्री, मुले" हा लिहिण्याचा ठराविक असा क्रम सारणीतून अवलंबिण्यात येतो. सदर क्रम कधीच "मुले, स्त्री, पुरुष" असा उलट तऱ्हेने लिहू नये.

ह्या पद्धतीस सांप्रदायिक–मांडणी पद्धती असे म्हणतात.

(५) **स्तंभ :** सारणीतून जेव्हा अधिक स्तंभ असतील तेव्हा त्यास संदर्भा-करिता अनुक्रमांक अथवा अक्षरे द्यावी.

(६) **स्तंभाचे मथळे (वृत्त)** प्रत्येक स्तंभाच्या शीर्षकास 'स्तंभ–वृत्त' असे म्हणतात. सदर वृत्त संक्षिप्त असावे. सारणीच्या उजव्या टोकास एक संकीर्ण स्तंभ ठेवावा.

( ७ ) **बुंधा :** रांगेच्या शीर्षकास ओळवृत्त असे म्हणतात.

सारणीच्या ज्या भागात हे ओळवृत्त असते, त्या विभागास बुंधा ( Stub ) असे म्हणतात. बुंध्यातील पदे नेहमी वर्गीत असल्यास न्यासाच्या निर्वचनास त्यामुळे मदतच होते. उदाहरणार्थ : १२ महिने हे ३ महिन्यांच्या एकाएका 'क्वार्टरमध्ये' विभाजित करून लिहिताना दोन क्वार्टरमध्ये जागा अथवा अवकाश सोडावा.

( ८ ) **योग :** स्तंभाचा योग हा त्या स्तंभाच्या शेवटी व खालच्या अंगास लिहावा. ओळींचा योग हा उजव्या अंगास चरमसीमेवर लिहावा.

( ९ ) **मापांकाचे एकक :** ह्याची माहिती पेटी–वृत्तात स्तंभाच्या मथळ्याखाली असावी.

(१०) **आखणी :** सारणीतील ओळींची आखणी खालीलप्रमाणे करतात. ( अ ) शीर्षकाखाली एक अनुप्रस्थ–रेषा ओढावी. त्याचप्रमाणे सारणी संपल्यावरही एक अनुप्रस्थ-रेषा काढावी. ( ब ) स्तंभ हे एकमेकांपासून एक-रेषेने विभक्त करावे. सारणीतील द्रव्य टाईप केलेले असेल तर अशा रेषेची आवश्यकता नसते; पण असल्यास उत्तम ! ( क ) पेटी-वृत्त व बुंधा ही एकमेकांपासून दोन अथवा जाडसर रेषेने वेगळी करावी. ( ड ) स्तंभातील योग-अंक व इतर-अंक हे एकमेकांपासून एक रेषेने अलग करून दाखवावे.

(११) **महत्त्व :** सारणीतील महत्त्वाच्या अंकाचे वृत्त-दर्शन दोन-रेषा, जाडसर रेषा इटालिक अथवा हलक्या व भरीव टाइपांचा उपयोग करून विशद करावे.

---

# चित्रांकण

इयत्तात्मक न्यासाच्या दृक् विवरणासाठी ज्या पद्धतींचा उपयोग होतो त्यास चित्रांकण असे म्हणतात.

चित्रांकणाचे अनेक प्रकार आहेत. न्यासाचे स्वरूप व कारण ह्यांच्या अनुरोधाने कोणते चित्रांकण वापरावे त्याची निश्चिती करावी.

**( १ ) रेखीय आणि वक्र चित्रांकण :**

( अ ) गणितीय प्रांकण.
( ब ) अर्ध–छेदा अथवा छेदा प्रांकण.
( क ) विशिष्ट प्रकारचे प्रांकण.
विशिष्ट प्रकारचे रेखीय प्रांकण.
( य ) एकरंगी कागदाचे कापलेले आकृती–चित्र.
( र ) पट्टी–चित्र.
( ल ) उंच–सखल चित्र.
( व ) आयत–चित्र.

( २ ) दंड–चित्र.
( ३ ) क्षेत्रफळ–चित्र.
( ४ ) घनफळ–चित्र. ( घनचित्रे )
( ५ ) संख्यानीय नकाशे.

**चित्रांकणाचे नियम :**

( १ ) प्रत्येक चित्रास संक्षिप्त पण परिशुद्ध असा मथळा असावा. चित्राच्या वर, मधल्या जागी, हा मथळा असावा. अशा मथळ्यामुळे खालील गोष्टींचे स्पष्टीकरण व विवरण होते.

( अ ) न्यासाचे स्वरूप.
( ब ) भौगोलिक परिस्थिती.
( क ) काल–खण्ड.

ही तीन्ही तत्त्वे दिलेल्या क्रमानुसार मथळ्यात ग्रथित असतात.

( २ ) याम–रेषा ह्या बारीक व आवश्यक तेवढ्याच असाव्या. वक्र–रेषा जाडसर असाव्या. जाडीमुळे त्या उठून दिसतात.

( ३ ) न्यासाचे मूळ चित्रांकणाच्या शेवटी डाव्या हातास असावे.

तळटीपा असल्यास, चित्रांकणाच्या खाली उजव्या हातास त्या असाव्या.

(५) वक्र-रेषा, वर्तुळ-खंड व इतर तपशील शक्यतोवर चित्रात जितके कमी असतील, तेवढे बरे; कारण त्यामुळे चित्रांचे आकलन सहजी होऊन चटकन ते लक्ष्यात भरते.

(६) प्रत्येक **पट्टीवर** त्याचा **मथळा** व त्याकरिता उपयोगात आणलेले एकक द्यावे.

(अ) य-यामरेषेचा मथळा त्या रेषेच्या मध्यभागी असावा.

(ब) र-यामरेषेचा मथळा त्या रेषेच्या वर-डोक्यावर-असावा.

(७) र-पट्टीवरील **शून्य बिन्दूची** सुरुवात नेहमी चित्रात दाखवावी. नाहीतर तुलनेत घोटाळा होतो. आकृती २९ मधील दोन शिखरे




आकृती २९

१९२६—३१ मधील पोलादाचे उत्पादन

तौलनिक दृष्ट्या तपासून पाहिल्यास शून्य बिन्दूची आवश्यकता पटेल. त्या आकृतीतील १९२८ व १९३० मधील पोलाद उत्पादनांकाची स्थिती दर्शविणाऱ्या बिन्दूच्या उंचीची निष्पत्ती चित्र २ मध्ये ५ : ४ अशी आहे, तर चित्र १ मध्ये तीच निष्पत्ती २ : १ अशी आहे.

यदाकदाचित जागा अपुरी असेल तर र–पट्टीवर **यामखंड** वापरून गाळलेला शून्य–बिन्दू दाखविता येतो. आकृती ३० मध्ये अशा प्रकारचे दोन यामखंड दिले आहेत.




आकृती ३०

( ८ ) 'य'–व 'र'– अक्षावर मापांक पट्टी द्यावी. त्यामुळे चित्रातील विचरणाच्या आकारमानाची स्पष्ट कल्पना येते.

( अर्थात, अति–सूक्ष्म असे फरक ह्या पट्टीवरून वाचणे शक्य नाही. त्याचप्रमाणे, कोणत्याही स्थानाच्या वास्तविक–अर्हाही ह्या पट्टीवरून कळणार नाहीत. त्याकरिता मूळ न्यासच धुंडाळावयास हवा. )

( ९ ) य–अक्षावरील अवकाश कालान्तर दर्शवीत असल्यास प्रत्येक आवर्तनकालाचा बिन्दू त्या अन्तरालाच्या मध्यभागी दाखवावा. वाटल्यास सदर आवर्तनकाल याम–रेषेशी जुळता ठेवून त्याचे बिन्दू त्या अक्षावरील रेषेवर प्रांकित करावे.

( १० ) र–अक्षावरील पट्टी शून्यापासून वर अधिक अर्हेप्रत खालून वर अशी न्यावी. य–अक्षावरील शून्य ते अधिक अर्हा डावीकडून उजवीकडे अशी वाढवीत न्यावी.

चित्राचे हे विशेष आकृती ३१ मध्ये दाखविले आहेत.




आकृती २१

**१. रेषा आणि वक्र–चित्र :**

इयत्तात्मक न्यासातील बदल रेषेने अथवा वक्राने दर्शविल्यास येणाऱ्या चित्रास रेषाचित्र अथवा वक्र–चित्र असे म्हणतात.

अशा प्रकारचे चित्र बिन्दूचे मिळून तयार होते. सदर बिन्दूची स्थाने 'य' व 'र'–अक्षावर त्यांच्या किंमतीप्रमाणे निश्चित केली जातात. हे सर्व बिन्दू मग सरळ रेषेने जोडावे.

अशा तऱ्हेची रेषा–चित्रे ही त्या चित्राकरिता वापरलेल्या पट्टीप्रमाणे विभक्त होतात. ( अ ) गणितीय पट्टी. ( ब ) छेदा–पट्टी. ( क ) इतर.

**गणितीय पट्टी :**

गणितीय पट्टीप्रमाणे आखलेल्या कागदावरील याम–रेषेचे अन्तर सर्वत्र सारखे असते. त्यामुळे सारख्या राशी अथवा मात्रांतील अन्तरही सारखेच असते. एक व तीन मधील अन्तर गणितीय पट्टीवर जेवढे असेल तेवढेच अन्तर आठ व दहामध्ये असते.

गणितीय कागदावर गणितीय श्रेढीचे प्रांकण केल्यास येणारे चित्र हे सरळ-

असते. कारण गणितीय–श्रेढी–अर्हा ह्या समान्तर व अचल अन्तराच्या त. त्याचप्रमाणे समान राशी ह्या समान अन्तराने दर्शित होतात व समान ने निरपेक्ष अशी सम अन्तरे दर्शवितात.

सरल–रेखीय अथवा वक्र–चित्र हे चित्रांकणाचे नेहमी उपयोगात येणारे ान्य चित्र–प्रकार होत.

छेदा अथवा अर्ध–छेदा प्रांकण :

निरपेक्ष परिवर्तनाऐवजी प्रतिशतता परिवर्तने प्रांकित करावयाची असल्यास ता एक निराळीच पट्टी उपयोगात आणतात.

दोन युग्म अंकांतील अचल असे प्रातिशतता बदल दाखवावयाचे असल्यास अंकाच्या छेदाने दाखवावे. असे केल्यास त्या छेदातील फरक सर्वत्र सारखा .

| अंक ... ... ... | छेदा | |
|---|---|---|
| २ ... ... ... | ०·३०१०३ | |
| ४ .... ... ... | ०·६०२०६ | |
| फरक | ०·३०१०३ | १०० % वाढ. |

| अंक .... ... ... | छेदा | |
|---|---|---|
| ५ .... ... ... | ०·६९८९७ | |
| १० ... ... ... | १·००००० | |
| फरक | ०·३०१०३ | १०० % वाढ |

म्हणजेच मूळ अंकाऐवजी त्यांचे छेदा प्रांकित केल्यास त्यांतील अचल प्रतिशतता बदल हे समान अन्तराने ( वर्धन अथवा अपवर्धन ) दर्शित त.

मूळ न्यासाचे छेदात रूपांतर करून मग तो प्रांकित करण्यात वेळेचा व वा बराचसा अपव्यय होतो. त्याकरिता एका विशिष्ट पट्टीवरून मूळ अंक छेदात रूपान्तरित करून प्रांकित करणे हिताचे असते. हे छेदा बहुशः गाणि-पट्टीत नेहमीच्या पद्धतीप्रमाणे प्रांकित करतात.

उदाहरणार्थ, दोन ह्या अंकाचा छेदा अगोदर छेदा–सारणीवरून काढावा. देल्याप्रमाणे ही अर्हा ०·३०१०३ आहे. ही अर्हा मग ग्राफ कागदावर त करावी. परन्तु जर अगोदरच अशी एखादी पट्टी तयार केलेली असेल की दोनाची छेदा–अर्हा ०·३०१०३ ने दाखविलेली असेल तर मग सदर दोन अंकाचे अनुक्रम असे छेदा न काढताच एकदम ग्राफवर प्रांकित करता येतील.

गणितीय पट्टी व त्यास अनुक्रामिक अशी छेदा–पट्टी ह्यांतील परस्पर संबंध आकृती ३२ मध्ये दिला आहे.




आकृती ३२

'य' व 'र' ह्या दोन्ही अक्षांवरील प्रांकण छेदा–पट्टीत असेल तर त्यास छेदा–प्रांकण असे म्हणतात. फक्त एकाच अक्षावर छेदा–प्रांकण असेल तर त्यास अर्ध–छेदा–प्रांकण असे म्हणतात.

य–अक्षावर काल दर्शविला जातो. म्हणून अर्ध–छेदा कागदातील य–अक्षावर गणितीय पट्टीचे प्रांकण असते. र–अक्षावर मात्र छेदा–पट्टीचे प्रांकण असते.

**छेदा–चित्राची लक्षणे :**

( १ ) अशा चित्रांतून शून्याची अथवा आधार–रेषा नसते.

( २ ) अर्ध—छेदा चित्रांतील अनुप्रस्थ अक्ष हा गणितीय पट्टीत असतो व कोटि-अक्ष हा छेदा-पट्टीत असतो. छेदा-चित्रातील दोन्ही अक्ष छेदा-पट्टीतच असतात.

( ३ ) छेदा—कागदावर गुणोत्तर-श्रेढीचे प्रांकण सरलरेखीय येते. कारण गुणोत्तर श्रेढीचे छेदा हे गणितीय श्रेढी प्रमाणात असतात.

( ४ ) सारख्या महत्त्वेचे वर्धन अथवा अपवर्धन हे छेदा कागदावर समान प्रतिशतता बदल दर्शवितात.

( ५ ) छेदा—चित्रातील समान उतार हे समान बदल दर्शवितात.

( अ ) असले छेदा प्रांकण (अ) अनुपाती परिवर्तनातील हे अर्घांची तुलना करण्याकरिता उपयोगात आणतात. ( ब ) दोन अथवा आधिक श्रेणी ज्यांच्या राशीत अतिशय फरक आहे अशातील संबंध दाखविण्याकरिता छेदा—प्रांकणाचा उपयोग करतात.

( क ) अशा संबंध—दर्शनासाठी गणितीय पट्टीपेक्षा छेदा—पट्टी अधिक उपयुक्त का असते हे आकृती ३३ व ३४ च्या तुलनेवरून कळून येईल.




आकृती ३३

१९२५–३२ मधील पौंड व फ्रँकांतील "एक्सचेंज रेट"




आकृती ३४

१९२५–३२मधील पौंड व फ्रँकांतील विनिमयाचा दर.

**विशेष प्रकारचीं रेखीय चित्रे :**

**१. सिलहौट चित्र** ( Silhoutte Charts ).

शून्य अथवा आधार–रेषेपासून असणारी धन व ऋण विचलने दर्शविणारे रेखीय चित्रास सिलहौट–चित्र म्हणतात. अशा चित्रातील आधार–रेषा व वक्रातील क्षेत्र मग काळ्या रंगाने भरून काढावे. ( आकृति ३५ )

आधार–रेषेपासून होणारी विचलने दर्शविणाऱ्या बिन्दूंचे प्रथम प्रांकण द्यावे. हे बिन्दू मग सांधावे. सरतेशेवटी आधार–रेषा व बिन्दू यामुळे तयार होणाऱ्या वक्रातील क्षेत्र काळ्या रंगाने भरावे.




आकृती ३५

१९१९-३३ दरम्यान संयुक्त संस्थानांतील सोन्याची हालचाल.

२. **पट्टी-चित्र :** हे सुद्धा एक प्रकारचे रेषा-चित्रच होय. न्यासातील एकूण विचरणे व त्याच्या विभागातील विचरणे उभ्या व आडव्या पट्टीवर दर्शविणाऱ्या चित्रास पट्टी-चित्र ( Band Chart ) असे म्हणतात.

हे चित्र तयार करताना प्रथम सर्वांत मोठ्या विभागातील विचरणे प्रांकित करावी व हा भाग मग रंगवून घ्यावा अथवा Cross hatch करावा. त्यानंतर ह्या विभागास दुसरा विभाग जोडावा व वरीलप्रमाणे प्रांकित करून रंगवावा अथवा रेषा माराव्या. अशा तऱ्हेने एकूणातील राहिलेले विभाग जोडून चित्र पूर्ण करावे. सर्वांत वरच्या रेषेतील विचरणे ही मग एकूणातील जी विचरणे आहेत ती दर्शवितात. इतर विभागांच्या रुंदीतील विचरणे ही त्या त्या भागांतील विचरणांचे दर्शक होत. आकृती ३६ हे अशा तऱ्हेचे पट्टी-चित्र होय.

( ३ ) रेषा–चित्राचा आणखी एक असलाच दुसरा नमुना म्हणजे ' **उंच-सखल** ' चित्राचा होय. कालखण्डातील परिवर्तनांचे चित्रण अशा रेषाचित्रांतून होते. शिवाय ह्या मोठ्या कालखंडाचे जे लहान विभाग–आठवडा, महिना वगैरे त्यातील विचलनेही अशा चित्रांतून दाखविता येतात. ह्या विचलनांच्या लहान–मोठ्या अर्हांही त्यातून परिणामकारकपणे प्रांकित होऊ शकतात.

कोणत्याही एका कालखंडाची सर्वांत लहान अर्हा आधी प्रांकित करून मग त्याची सर्वांत मोटी अर्हा प्रांकित करावी. अशा तऱ्हेने एकूण कालखंड संपेपर्यंतचे प्रांकण पूर्ण करावे. त्यानंतर उंचीवरचा बिन्दू व त्याचाच अनुक्रम असा खालचा बिन्दू जाडसर रेषेने सांधावा. अशा प्रकारे तयार होणाऱ्या ह्या रेषांतील अन्तर भरगच्च असल्याने एखाद्या अनियमित पट्टीप्रमाणे हे चित्र दिसते.

( ४ ) **आयत–चित्र :** ह्या चित्रास आयताकार वारंवारता–बहुभुज–चित्र असेही म्हणतात. हे चित्र वारंवारता बंटनावरून तयार करतात. आयताची रुंदी संभागन्तरालाच्या आकाराएवढी धरावी. आयताची उंची त्या संभागातील वारंवारतेइतकी असावी. प्रत्येक संभागाकरिता अशा तऱ्हेने एक आयत ह्या प्रमाणात सदर चित्र पूर्ण करावे.




आकृती ३६

१९२४ ते ३० दरम्यान संयुक्त संस्थानांतील उदिमांतील नादारी.

## दण्ड–चित्र :

ह्या चित्रात निरनिराळ्या लांबीचे ( परन्तु समान रुंदीचे ) असे दण्ड असतात. दण्डाची लांबी ही प्रत्येक विभागातील राशीप्रमाणात असते.

ही दण्ड–चित्रे खालील चार प्रकारात विभक्त होतात.

१. निरपेक्ष, ( अ ) साधी, ( ब ) भंजित.

२. प्रतिशत, ( अ ) साधी, ( ब ) भंजित.

### साधी निरपेक्ष दण्ड–चित्रे :

एकात्र आधार–रेषेवर समान–रुंदीचे असे आयताकार दण्ड उभारावे. दण्डाची उंची ही निरपेक्ष न्यासाच्या प्रमाणात असावी. हे दण्ड अनुप्रस्थ अथवा उदग्र–रेषेत असू शकतात. कालाचे प्रांकण असेल तेथे मात्र उदग्र–रेषेतील दण्ड-चित्र रेखाटण्याचा प्रघात आहे. ( आकृती ३७–अ )

### भंजित निरपेक्ष दण्ड–चित्रे :

अशा चित्रांतील दण्डाचे प्रत्येक विभागाच्या राशीप्रमाणांत विभाजन केलेले असते. दण्डाचे विभाग हे सारख्या क्रमाने रचलेले असतात. सर्वात मोठा विभाग हा आधार–रेषेपासून सुरू होतो. अर्थात् ह्या निरपेक्ष अंकाचा विस्तार बदलता असल्यास सर्वात मोठा विभागही आधार म्हणून राहणे शक्य नसते. तरीपण प्रांकणाचा क्रम मात्र एकच ठरीव असाच असावा. अशा तऱ्हेचे भंजित चित्र हे संचयी–चित्र असते. कारण त्यांतील निरनिराळ्या विभागांची बेरीज ही एकूणाच्या बरोबर असते. ( आकृती ३७ ब )

### साधी प्रतिशतता दण्ड–चित्रे :

हे दण्डचित्रही वरीलप्रमाणेच तयार होते. निरपेक्ष अंकाऐवजी त्याच्या प्रतिशत अर्हा फक्त उपयोगात आणतात. प्रत्येक दन्डाची लांबी ही एकूणाच्या विभागीय प्रतिशततेइतकी असते. ( आकृती ३७ क )

### भंजित प्रतिशतता दण्ड–चित्र :

एकाच आधारावर समान रुंदीचे व लांबीचे दण्ड उभारावे. त्या दण्डाची उंची ही शंभर प्रतिशत मानून त्याचे मग एकूणाचे जे विभाग असतात त्या प्रमाणात ही उंची विभाजित करावी. सर्वात मोठा विभाग खाली आधाराला घेऊन त्यावर इतर विभाग ह्याप्रमाणे चित्र पूर्ण करावे. ( आकृती ३७ ड )




आकृती ३७

१९२०–२५ व ३० मधील संयुक्त संस्थानांतील निर्गत.

ह्या भंजित दण्डचित्राचा एक विशेष प्रकार म्हणजे ज्यात फक्त एकच दण्ड असतो असा होय. एका विशिष्ट विभागावरच जेव्हा लक्ष्य केन्द्रित करावयाचे असते तेव्हा अशा चित्रातून एक दण्ड उपयोगात आणतात. दण्डाची एकूण लांबी ही १०० प्रतिशत मानावी. ही लांबी मग एकूणातील विभागांच्या प्रमाणात डावी-कडून उजवीकडे अशा रीतीने विभाजित करावी.

### चित्रमय दण्ड–चित्रे :

निरनिराळ्या तऱ्हेची सांकेतिक पण सर्वमान्य ठराविक अशी चित्रेसुद्धा राशितुलनेसाठी उपयोगात आणतात. अशा वेळेस त्या चित्रांच्या उंचीवरून एकूणा-तील निरनिराळ्या विभागांची तुलना करावी.

निरनिराळ्या काळी हिंदुस्थानजवळ असलेल्या गंगाजळीची तुलना हवी असल्यास निरनिराळ्या उंचीच्या रुपयांच्या गंजीने अथवा राशीने हे शक्य आहे. अशा चित्रांतून रुपयांच्या चव्वडची उंची ही त्या काळातील देशातील गंगा-जळीची किंमत दर्शविते.

### नफा–नुकसानदर्शक दण्ड–चित्र :

अशा चित्राकरिता सर्वप्रथम आधार म्हणून एक शून्याची रेषा धरावी. ही आधाररेषा अनुप्रस्थ असेल तर आधाररेषेच्या डावीकडील दण्ड नुकसान दर्शवितो; व उजवीकडील दण्डनफा दर्शवितो असे समजावे. उदग्र–रेषेत दण्ड–चित्र काढल्यास आधाररेषेच्या वरील दण्ड नफा–दर्शक समजावे. तर आधार–रेषेच्या खालचा दण्ड नुकसान–दर्शक समजावा.

### क्षेत्रफळ चित्रे :

अशा चित्रातून राशीची तुलना ही क्षेत्रफळाच्या बदलत्या प्रमाणानुसार करण्यात येते. क्षेत्रफळ–चित्रे ही निरनिराळ्या प्रकारची असू शकतात. उदाहरणार्थ ज्यात समायत, वर्तुळ अथवा काही वेळेस घनाकार आकृतींचा उपयोग आहे अशी चित्रे. क्षेत्रफळ–चित्रांचे पुन्हा दोन गट पडतात. एक, ती चित्रे ज्यांत संपू-र्णांची तुलना त्याच्या विभागाशी करितात. अशा चित्रांतून निरनिराळ्या राशि–पदांची तुलना अनुपाती अशा समायत, वर्तुळ अथवा घनाकार आकृतीवरून करतात. दुसऱ्या तऱ्हेची चित्रे म्हणजे ज्यात एकाच संपूर्णाच्या निरनिराळ्या विभागांची तुलना असते. अशा वेळेस त्या एका क्षेत्राची विभागणी संपूर्णाच्या निरनिराळ्या प्रमाणांत करावी.

**वर्तुळ-चित्र :**

क्षेत्रफळ चित्रांपैकी विशेष उपयुक्त व नेहमीच्या वापरातले असे चित्र म्हणजे वर्तुळ-चित्र होय.

एक वर्तुळ काढून ते आवश्यक अशा निरनिराळ्या विभागांत विभाजित केल्यास हे चित्र तयार होते. अशा चित्रातील निरनिराळे भाग हे एकूणाचे जे विभाग असतात ते दर्शवितात.




आकृती ३८ : १९३० मधील संयुक्त संस्थानची निर्गत: आर्थिक विभाजनानुसार.

रचना :

(१) वर्तुळ म्हणजे १०० प्रतिशत समजावे.

(२) प्रत्येक वर्तुळ ३६० अंशांत विभाजित करावे.

( ३ ) म्हणून प्रत्येक प्रतिशत $= \frac{३६०}{१००}$

म्हणजे : ३·६° अंश होय.

**लक्षणे :**

( १ ) वर्तुळातील खण्डांची रचना ही सामान्यतः न्यासातील विभागांच्या आकारमानाप्रमाणे व घड्याळातील काटा फिरतो त्याप्रमाणे असावी.

( २ ) तुलनेसाठी वर्तुळ-खण्डांची रचना ही एकरूप असावी.

( ३ ) शक्यतोवर प्रतिशत-प्रमाणाचे अंक व सूचक शब्द हे वर्तुळ खण्डास अनुप्रस्थ असे लिहावे.

( ४ ) रंगकाम, निरनिराळ्या रेषांचा उपयोग अथवा प्रकाश-छायेचा उपयोग केला गेल्यास चित्राखाली त्याची सूची द्यावी.

( ५ ) अशा वर्तुळ-चित्रांची परिणामकारकता रंगकाम, निरनिराळ्या प्रकारच्या रेषांचा उपयोग ह्यामुळे अधिक उठून दिसते.

( ६ ) अगदी कमीत कमी असे वर्तुळ-खण्ड अशा चित्रातून असावे.

( ७ ) वर्तुळ-चित्रातून परिशुद्धतेचे प्रमाण मात्र कमी असते.

( ८ ) अशा वर्तुळ-चित्रातून प्रातिशत प्रमाण न वापरल्यास निव्वळ दृष्टीने निरनिराळ्या विभागांची कल्पना करणे शक्यच नसते.

## घनाकार चित्रे

ही चित्रे अनेक भूमितीय आकार वापरून तयार करतात. उदाहरणार्थ :— घन, गोल, लंब-वर्तुळ वगैरे. कधी कधी घनाकार अनियमित आकृत्याही महत्त्वाच्या तुलनेप्रीत्यर्थ वापरतात ( आकृती ३९ व ४० ). अशा वेळेस तुलनेसाठी त्या आकृतीची उंची अथवा लांबी उपयोगात येत नाही, तर त्या आकृतीच्या घनफळाची तुलना करतात.

घनाकार चित्रामुळे न्यासाची परिशुद्ध अशी तुलना होऊ शकत नाही. तुलनेचे इतर प्रकार उपलब्ध असल्यास घनाकार चित्रांचा उपयोग टाळणेच हितकर असते.

## नकाशे

भौगोलिक वंटन हे नकाशाद्वारे दाखविता येते. सांख्यिकीय आधाराने तयार होणारे अशा प्रकारचे नकाशे हे पाच प्रकारचे असतात. ( १ ) छाया—










आकृती ३९ व ४० : डिसेंबर ३०, १९३० ला ग्रेट ब्रिटन व संयुक्तसंस्थानांत असलेला सोन्याचा साठा.

प्रकाशाने दाखविलेले. ( २ ) निरनिराळ्या रेषांच्या उपयोगाने सूचित होणारे. ( ३ ) बिन्दूने दर्शविलेले. ( ४ ) रंगीत. ( ५ ) टाचण्याद्वारे दर्शित होणारे : ( अ ) टॆकस द्वारा, ( ब ) टाचणीद्वारा, ( क ) लहान ध्वजद्वारा.

### छाया-प्रकाशाने दर्शित नकाशे :

निरनिराळ्या क्षेत्रांतील महत्त्वे प्रमाण कमी अधिक काळसर ते शुभ्र अशा छायाप्रकाशाने दाखवावे.

### रेषा-गुंफण नकाशे :

रेषांतील गुंफण कमी-अधिक प्रमाणात काळी-पांढरी वाढवून न्यासातील राशी भौगोलिक महत्त्व सूचित करतात.

### बिन्दूने दर्शविलेले नकाशे :

लहानमोठे बिन्दू वापरून हे नकाशे विशेषत: दोन प्रकारांनी तयार होतात.

( अ ) समान-आकाराचे बिन्दू वापरून जे नकाशे तयार करतात त्यात फक्त ह्या बिन्दूचे प्रमाण कमी-अधिक केल्याने न्यासातील अंकाच्या घनतेचा बोध होतो.

( ब ) लहान-मोठे बिन्दू वापरून तयार होणाऱ्या नकाशाद्वारे त्या विभागातील एकूण संख्येचा अथवा महत्त्वाचा बोध होतो.

( क ) एकाच ठराविक आकाराचे, ठराविक किंमत असलेले, बिन्दू वापरून तयार होणाऱ्या नकाशाद्वारे प्रत्येक क्षेत्रातील राशी किती आहे ह्याची कल्पना येते.

अशा वेळेस तौलनिक महत्ता दर्शवावयाची असल्यास विशेष खबरदारी घ्यावयास हवी, कारण ही तुलना बिन्दूचे निव्वळ आकारमान वाढवून अथवा कमी करूनच करावयाची असते.

### रंगीत नकाशे :

( अ ) महत्त्वतील अथवा आकारमानातील फरक दाखवावयाचा असेल तर निरनिराळे रंग वापरावे. सापेक्ष अर्हा अथवा आकारमानासाठी रंगाच्या निरनिराळ्या छटा वापरू नयेत. कारण रंगांच्या ह्या छटेतील सूक्ष्मतर फरक नुसत्या नजरेने लक्ष्यात येत नाही; त्यामुळे घोटाळा होण्याचा संभव असतो.

( ब ) एकाच प्रदेशातील तौलनिक स्थानांच्या दिग्दर्शनार्थ मात्र एकाच रंगाच्या निरनिराळ्या छटा वापरल्यास हरकत नाही. अर्थात एकाच रंगाच्या निरनिराळ्या छटांचे प्रकार सीमित असल्याने त्या वापरताना काळजी घ्यावी.

### टेकस वापरून तयार होणारे नकाशे

निरनिराळ्या रंगांचे टेकस अथवा निरनिराळ्या रंगांच्या लहान ध्वजांचा उपयोग करून तयार होणाऱ्या नकाशाद्वारे अनेकविध उद्देश सफल होतात. विशेषतः त्यामुळे भौगोलिक क्षेत्रातील घनता प्रकट होते. युद्धभूमीवरील सैन्याची घनता, हालचाल, तसेच वाटचालीचे मार्गक्रमण, इत्यादिकांकरिता ह्याचा विशेष उपयोग होतो. **संरक्षण सांख्यिकीत** अशा नकाशांचे महत्त्व अतिशय आहे, कारण अशा प्रकारचे नकाशे हे दृक्दर्शनाचे एक फार प्रभावी अस्त्र होय !

---

# परिशिष्ट:

## परिशिष्ट १ : सारणी

१. छेदा-सारणी.

२. १ ते ५० अंकांच्या पहिल्या तीन वर्गांचे योग.

३. क्ष$^{2}$–सारणी.

## परिशिष्ट २ : सूत्रांचा कोष.

## परिशिष्ट ३ : शब्दांचा कोष.

## परिशिष्ट ४ : संदर्भ व इतर ग्रंथांची सूचि.

वर्ग व वर्गमूळ.

सहसम्बन्ध मापांक.

• • •

## छेदा–सारणी

|  | ० | १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १० | ·००००० | ·००४३२ | ·००८६० | ·०१२८४ | ·०१७०३ | ·०२११९ | ·०२५३१ |
| ११ | ·०४१३९ | ·०४५३२ | ·०४९२२ | ·०५३०८ | ·०५६९० | ·०६०७० | ·०६४४६ |
| १२ | ·०७९१८ | ·०८२७९ | ·०८६३६ | ·०८९९१ | ·०९३४२ | ·०९६९१ | ·१००३७ |
| १३ | ·११३९४ | ·११७२७ | ·१२०५७ | ·१२३८५ | ·१२७१० | ·१३०३३ | ·१३३५४ |
| १४ | ·१४६१३ | ·१४९२२ | ·१५२२९ | ·१५५३४ | ·१५८३६ | ·१६१३७ | ·१६४३५ |
| १५ | ·१७६०९ | ·१७८९८ | ·१८१८४ | ·१८४६९ | ·१८७५२ | ·१९०३३ | ·१९३१२ |
| १६ | ·२०४१२ | ·२०६८३ | ·२०९५२ | ·२१२१९ | ·२१४८४ | ·२१७४८ | ·२२०११ |
| १७ | ·२३०४५ | ·२३३०० | ·२३५५३ | ·२३८०५ | ·२४०५५ | ·२४३०४ | ·२४५५१ |
| १८ | ·२५५२७ | ·२५७६८ | ·२६००७ | ·२६२४५ | ·२६४८२ | ·२६७१७ | ·२६९५१ |
| १९ | ·२७८७५ | ·२८१०३ | ·२८३३० | ·२८५५६ | ·२८७८० | ·२९००३ | ·२९२२६ |
| २० | ·३०१०३ | ·३०३२० | ·३०५३५ | ·३०७५० | ·३०९६३ | ·३११७५ | ·३१३८७ |
| २१ | ·३२२२२ | ·३२४२८ | ·३२६३४ | ·३२८३८ | ·३३०४१ | ·३३२४४ | ·३३४४५ |
| २२ | ·३४२४२ | ·३४४३९ | ·३४६३५ | ·३४८३० | ·३५०२५ | ·३५२१८ | ·३५४११ |
| २३ | ·३६१७३ | ·३६३६१ | ·३६५४९ | ·३६७३६ | ·३६९२२ | ·३७१०७ | ·३७२९१ |
| २४ | ·३८०२१ | ·३८२०२ | ·३८३८२ | ·३८५६१ | ·३८७३९ | ·३८९१७ | ·३९०९४ |

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| २५ | ·३९७९४ | ·३९९६७ | ·४०१४० | ·४०३१२ | ·४०४८३ | ·४०६५४ | ·४०८२४ |
| २६ | ·४१४९७ | ·४१६६४ | ·४१८३० | ·४१९९६ | ·४२१६० | ·४२३२५ | ·४२४८८ |
| २७ | ·४३१३६ | ·४३२९७ | ·४३४५७ | ·४३६१६ | ·४३७७५ | ·४३९३३ | ·४४०९१ |
| २८ | ·४४७१६ | ·४४८७१ | ·४५०२५ | ·४५१७९ | ·४५३३२ | ·४५४८४ | ·४५६३७ |
| २९ | ·४६२४० | ·४६३८९ | ·४६५३८ | ·४६६८७ | ·४६८३५ | ·४६९८२ | ·४७१२९ |
| ३० | ·४७७१२ | ·४७८५७ | ·४८००१ | ·४८१४४ | ·४८२८७ | ·४८४३० | ·४८५७२ |
| ३१ | ·४९१३६ | ·४९२७६ | ·४९४१५ | ·४९५५४ | ·४९६९३ | ·४९८३१ | ·४९९६९ |
| ३२ | ·५०५१५ | ·५०६५१ | ·५०७८६ | ·५०९२० | ·५१०५५ | ·५११८८ | ·५१३२२ |
| ३३ | ·५१८५१ | ·५१९८३ | ·५२११४ | ·५२२४४ | ·५२३७५ | ·५२५०४ | ·५२६३४ |
| ३४ | ·५३१४८ | ·५३२७५ | ·५३४०३ | ·५३५२९ | ·५३६५६ | ·५३७८२ | ·५३९०८ |
| ३५ | ·५४४०७ | ·५४५३१ | ·५४६५४ | ·५४७७७ | ·५४९०० | ·५५०२३ | ·५५१४५ |
| ३६ | ·५५६३० | ·५५७५१ | ·५५८७१ | ·५५९९१ | ·५६११० | ·५६२२९ | ·५६३४८ |
| ३७ | ·५६८२० | ·५६९३७ | ·५७०५४ | ·५७१७१ | ·५७२८७ | ·५७४०३ | ·५७५१९ |
| ३८ | ·५७९७८ | ·५८०९२ | ·५८२०६ | ·५८३२० | ·५८४३३ | ·५८५४६ | ·५८६५९ |
| ३९ | ·५९१०६ | ·५९२१८ | ·५९३२९ | ·५९४३९ | ·५९५५० | ·५९६६० | ·५९७७० |
| ४० | ·६०२०६ | ·६०३१४ | ·६०४२३ | ·६०५३१ | ·६०६३८ | ·६०७४६ | ·६०८५३ |
| ४१ | ·६१२७८ | ·६१३८४ | ·६१४९० | ·६१५९५ | ·६१७०० | ·६१८०५ | ·६१९०९ |
| ४२ | ·६२३२५ | ·६२४२८ | ·६२५३१ | ·६२६३४ | ·६२७३७ | ·६२८३९ | ·६२९४१ |
| ४३ | ·६३३४७ | ·६३४४८ | ·६३५४८ | ·६३६४९ | ·६३७४९ | ·६३८४९ | ·६३९४९ |
| ४४ | ·६४३४५ | ·६४४४४ | ·६४५४२ | ·६४६४० | ·६४७३८ | ·६४८३६ | ·६४९३३ |

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| ४५ | ·६५३२१ | ·६५४१८ | ·६५५१४ | ·६५६१० | ·६५७०६ | ·६५८०१ | ·६५८९६ |
| ४६ | ·६६२७६ | ·६६३७० | ·६६४६४ | ·६६५५८ | ·६६६५२ | ·६६७४५ | ·६६८३९ |
| ४७ | ·६७२१० | ·६७३०२ | ·६७३९४ | ·६७४८६ | ·६७५७८ | ·६७६६९ | ·६७७६१ |
| ४८ | ·६८१२४ | ·६८२१५ | ·६८३०५ | ·६८३९५ | ·६८४८५ | ·६८५७४ | ·६८६६४ |
| ४९ | ·६९०२० | ·६९१०८ | ·६९१९७ | ·६९२८५ | ·६९३७३ | ·६९४६१ | ·६९५४८ |
| | | | | | | | |
| ५० | ·६९८९७ | ·६९९८४ | ·७००७० | ·७०१५७ | ·७०२४३ | ·७०३२९ | ·७०४१५ |
| ५१ | ·७०७५७ | ·७०८४२ | ·७०९२७ | ·७१०१२ | ·७१०९६ | ·७११८१ | ·७१२६५ |
| ५२ | ·७१६०० | ·७१६८४ | ·७१७६७ | ·७१८५० | ·७१९३३ | ·७२०१६ | ·७२०९९ |
| ५३ | ·७२४२८ | ·७२५०९ | ·७२५९१ | ·७२६७३ | ·७२७५४ | ·७२८३५ | ·७२९१६ |
| ५४ | ·७३२३९ | ·७३३२० | ·७३४०० | ·७३४८० | ·७३५६० | ·७३६४० | ·७३७१९ |
| | | | | | | | |
| ५५ | ·७४०३६ | ·७४११५ | ·७४१९४ | ·७४२७३ | ·७४३५१ | ·७४४२९ | ·७४५०७ |
| ५६ | ·७४८१९ | ·७४८९६ | ·७४९७४ | ·७५०५१ | ·७५१२८ | ·७५२०५ | ·७५२८२ |
| ५७ | ·७५५८७ | ·७५६६४ | ·७५७४० | ·७५८१५ | ·७५८९१ | ·७५९६७ | ·७६०४२ |
| ५८ | ·७६३४३ | ·७६४१८ | ·७६४९२ | ·७६५६७ | ·७६६४१ | ·७६७१६ | ·७६७९० |
| ५९ | ·७७०८५ | ·७७१५९ | ·७७२३२ | ·७७३०५ | ·७७३७९ | ·७७४५२ | ·७७५२५ |
| | | | | | | | |
| ६० | ·७७८१५ | ·७७८८७ | ·७७९६० | ·७८०३२ | ·७८१०४ | ·७८१७६ | ·७८२४७ |
| ६१ | ·७८५३३ | ·७८६०४ | ·७८६७५ | ·७८७४६ | ·७८८१७ | ·७८८८८ | ·७८९५८ |
| ६२ | ·७९२३९ | ·७९३०९ | ·७९३७९ | ·७९४४९ | ·७९५१८ | ·७९५८८ | ·७९६५७ |
| ६३ | ·७९९३४ | ·८०००३ | ·८००७२ | ·८०१४० | ·८०२०९ | ·८०२७७ | ·८०३४६ |
| ६४ | ·८०६१८ | ·८०६८६ | ·८०७५४ | ·८०८२१ | ·८०८८९ | ·८०९५६ | ·८१०२३ |

| | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ६५ | ·८१२९१ | ·८१३५८ | ·८१२४५ | ·८१४९१ | ·८१५५८ | ·८१६२४ | ·८१६९० | · |
| ६६ | ·८१९५४ | ·८२०२० | ·८२०८६ | ·८२१५१ | ·८२२१७ | ·८२२८२ | ·८२३४७ | · |
| ६७ | ·८२६०७ | ·८२६७२ | ·८२७३७ | ·८२८०२ | ·८२८६६ | ·८२९३० | ·८२९९५ | · |
| ६८ | ·८३२५१ | ·८३३१५ | ·८३३७८ | ·८३४४२ | ·८३५०६ | ·८३५६९ | ·८३६३२ | · |
| ६९ | ·८३८८५ | ·८३९४८ | ·८४०११ | ·८४०७३ | ·८४१३६ | ·८४१९८ | ·८४२६१ | · |
| ७० | ·८४५१० | ·८४५७२ | ·८४६३४ | ·८४६९६ | ·८४७५७ | ·८४८१९ | ·८४८८० | · |
| ७१ | ·८५१२६ | ·८५१८७ | ·८५२४८ | ·८५३०९ | ·८५३७० | ·८५४२१ | ·८५४९१ | · |
| ७२ | ·८५७३३ | ·८५७९४ | ·८५८५४ | ·८५९१४ | ·८५९७४ | ·८६०३४ | ·८६०९४ | · |
| ७३ | ·८६३३२ | ·८६३९२ | ·८६४५१ | ·८६५१० | ·८६५७० | ·८६६२९ | ·८६६८८ | · |
| ७४ | ·८६९२३ | ·८६९८२ | ·८७०४० | ·८७०९९ | ·८७१५७ | ·८७२१६ | ·८७२७४ | · |
| ७५ | ·८७५०६ | ·८७५६४ | ·८७६२२ | ·८७६७९ | ·८७७३७ | ·८७७९५ | ·८७८५२ | · |
| ७६ | ·८८०८१ | ·८८१३८ | ·८८१९५ | ·८८२५२ | ·८८३०९ | ·८८३६६ | ·८८४२३ | · |
| ७७ | ·८८६४९ | ·८८७०५ | ·८८७६२ | ·८८८१८ | ·८८८७४ | ·८८९३० | ·८८९८६ | · |
| ७८ | ·८९२०९ | ·८९२६५ | ·८९३२१ | ·८९३७६ | ·८९४३२ | ·८९४८७ | ·८९५४२ | · |
| ७९ | ·८९७६३ | ·८९८१८ | ·८९८७३ | ·८९९२७ | ·८९९८२ | ·९००३७ | ·९००९१ | · |
| ८० | ·९०३०९ | ·९०३६३ | ·९०४१७ | ·९०४७२ | ·९०५२६ | ·९०५८० | ·९०६३४ | · |
| ८१ | ·९०८४९ | ·९०९०२ | ·९०९५६ | ·९१००९ | ·९१०६२ | ·९१११६ | ·९११६९ | · |
| ८२ | ·९१३८१ | ·९१४३४ | ·९१४८७ | ·९१५४० | ·९१५९३ | ·९१६४५ | ·९१६९८ | · |
| ८३ | ·९१९०८ | ·९१९६० | ·९२०१२ | ·९२०६५ | ·९२११७ | ·९२१६९ | ·९२२२१ | · |
| ८४ | ·९२४२८ | ·९२४८० | ·९२५३१ | ·९२५८३ | ·९२६३४ | ·९२६८६ | ·९२७३७ | · |

